


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

आह्मां घरीं धन शब्दाचींच रत्ने ।
शब्दाचींच शस्त्रें यत्न करूं ॥
शब्द चि आमुच्या जीवाचें जीवन ।
शब्दें वांटूं धन जनलोकां ॥
तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव ।
शब्दें चि गौरव पूजा करूं ॥

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष १२ : अंक ३ : पावसाळा : १९९४



अनुक्रमणिका

---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द.दि. पुंडे, प्र.ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३३६०६१ / २४)

**मुखपृष्ठ :** ~~[illegible]~~

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४. (दूरध्वनी ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : कल्याण काळे / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा / मुद्रणस्थळ : संगम प्रेस प्रा.लि., कोथरूड, पुणे २९.

संपादकीय

# संस्कृतीचं जतन

- विजया देव

कॅनरा बँकेची एक जाहिरात मध्यंतरी वृत्तपत्रांमध्ये झळकलेली पाहिली. आपलं राहणीमान उंचावण्यासाठी वेगवेगळया कर्जयोजनांमधून ही बँक आपली पैशाची गरज भागवते, हे आपल्या वाचकांच्या मनांवर ठसवण्यासाठी या जाहिरातीमध्ये दोन चित्रं दाखवली होती- एकाच घराच्या दिवाणखान्याची. या बँकेकडून कर्ज काढण्याआधीचा दिवाणखाना आणि कर्जानंतरच्या आलिशान राहणीमानामुळे झिलई चढलेला नंतरचा दिवाणखाना. गालिचा, संगणक, सुखद प्रकाशयोजना, टेबलाला काचेचा टॉप, उत्तम फर्निचर, अडीअडचणीला असावी, म्हणून रोख रक्कम, इत्यादी अनेक गोष्टींची भर दुसऱ्या चित्रात पडलेली आहे. हे सगळं शक्य झालं, त्या बँकेच्या कर्जयोजनांमुळे. 'क्लॅरिअन' या नामवंत जाहिरात संस्थेनं ही जाहिरात केली आहे.

उत्तमच! सुबत्ता वाढलेली, सुखसोयीच्या गोष्टी घरात आलेल्या कुणाला नाही आवडणार? फक्त एक खटकलं. पहिल्या चित्रात जे पुस्तकांचं शेल्फ दाखवलंय्, त्यात, दुसऱ्या चित्रात एकाही नवीन पुस्तकाची भर पडलेली नाही. कोपऱ्यातल्या दुसऱ्या कपाटात मात्र नव्या कोऱ्या नोटांच्या थप्प्या पडलेल्या आहेत. (नशीब, अडगळ होते, म्हणून पहिल्यातली पुस्तकं काढून टाकलेली दाखवली नाहीत.)

माझ्या मनात विचार आला, कॅनरा बँक आणि 'क्लॅरिअन' या दोन्ही संस्थांमधली माणसं सुशिक्षित. इंग्रजी वृत्तपत्रात ज्या प्रकारे ही जाहिरात येते, त्यावरून त्यांना अभिप्रेत असलेला ग्राहकवर्गही उच्चभ्रू, सुशिक्षित आणि अभिरुचीची जाण असलेला. मग त्यांना निव्वळ तपशील, चित्रमांडणी म्हणून तरी पुस्तकं वाढलेली दाखवावीत, असं का बरं वाटलं नसेल?

कारण उघड आहे. आपला तथाकथित सुशिक्षित, सुसंस्कृत वर्ग सध्या वैचारिक दारिद्र्याच्या भोवऱ्यात अडकलेला आहे. ही जाहिरात हे त्याचंच प्रतीक आहे. सुबत्ता, राहणीमानाचा स्तर उंचावणं, चांगलं जीवन जगणं यात पुस्तकांचा प्रश्न येतोच कुठं?

या चित्रात मुळातच पुस्तकं दाखवली नसती, तरी काही बिघडलं नसतं; पण पहिली तुटपुंजी संख्या तेवढीच दाखवली; म्हणून वाटलं, माणूस आर्थिक चणचण

असतानाच पुस्तकं विकत घ्यायचा वेडा विचार करतो, की काय!

लक्ष्मी ही आपली देवी आहे आणि 'अर्थ' हा एक पुरुषार्थ. तेव्हा आपली संस्कृती काही आपल्याला भौतिक सुखांपासून पराङ्मुख करत नाही. पण संपन्न जीवनाला तेज प्राप्त होतं, ते ज्ञानामुळं आणि ज्ञान मिळवण्याचा एक मार्ग 'पुस्तकं' हा आहे. सुसंस्कृतपणात भर टाकायचा थोडा वाटा पुस्तकं उचलतात, हे समजून न घेण्याइतके आपण बोथट झालो आहोत का?

ही खंत वाटत असतानाच थोडा दिलासा देणारी एक बातमी गेल्या आठवड्यातच वृत्तपत्रात वाचली. बातमी मुंबईतली. मुंबईच्या एका उपनगरातल्या एका विशाल निवासी संकुलातल्या लोकांनी ठरवून टाकलं, की आपल्या घरांमधून दूरचित्रवाणी संचांना हद्दपार करायचं. शेकडो कुटुंबांनी एकमतानं हा निर्णय घेऊन आपापल्या संचांना रजा दिली. (एकानं तर आपला टीव्ही उचलला आणि दिला फेकून वरच्या मजल्यावरून खाली.) या ठिकाणचे सर्व लोक सुशिक्षित, विविध व्यवसायांमध्ये भरभराटलेले. वकील, डॉक्टर, इंजिनीयर, इत्यादी. चित्रवाणीचे फायदे त्यांना माहीत नाहीत, असे नव्हे. पण फायदे नगण्य आणि तोटे भरमसाट, हे प्रमाण पडायला लागल्यावर मात्र त्यांनी एकमुखानं एक निर्धार केला आणि अमलात आणला. एरवी जो वेळ त्यांनी टीव्हीसमोर घालवला असता, तो ते आता वाचन, अभ्यास, कौटुंबिक सहली यांत अधिक आनंदानं घालवतात आणि कौटुंबिक सौहार्दाचा एक वेगळा अनुभव घेतात.

कशाच्या तरी मागे धावण्याचा आंधळा हव्यास संपून डोळस वाटचाल सुरू झाल्याच्या खुणा जागोजाग दिसायला हव्या आहेत. म्हणजे चित्रवाणीलाच रजा द्यायला पाहिजे, असं नाही! प्रवासात वेळ जावा, म्हणून शब्दकोडं सोडवणाऱ्यांकडे पाहिलं, तरी मला अशी खूण दिसते. आलेले शब्द चौकटींमध्ये भरणं, न आलेल्यांसाठी डोक्याला ताण देणं, तो ताण समोरच्याला जाणवला, की त्यानं त्या शब्दकोड्यात डोकं घालणं आणि पाहता पाहता एक पेपरात पाच-सात डोकी घुसणं हे दृश्य मलाही अलिप्तपणे पाहणं जड जातं.

अशा वरवर निरुपद्रवी वाटणाऱ्या भाषिक-बौद्धिक करामतीच आपल्याला रस्ता चुकू देत नाहीत.

(यात उल्लेख केलेली जाहिरात आणि बातमी 'टाइम्स ऑफ इंडिया'त अनुक्रमे ३० जुलै आणि २० डिसेंबर, १९९४ रोजी वाचनात आली.)

○○

# कै. गुरुवर्य डॉ. शं. गो. तुळपुळे

- मु. श्री. कानडे

डॉ. तुळपुळे यांची १९५० मध्ये पुणे विद्यापीठामध्ये मराठी विभागाचे प्रमुख म्हणून नियुक्ती झाली. त्या वेळी मी स. प. महाविद्यालयामध्ये बी. ए.च्या पहिल्या वर्षाचा विद्यार्थी होतो. मी स. प.चाच विद्यार्थी होतो. परंतु फर्ग्युसन, वाडिया, इ. महाविद्यालयांत बी. ए.साठी नाव नोंदविलेले विद्यार्थीही विद्यापीठाच्या केंद्रीकरणाच्या योजनेनुसार स. प. मध्येच येत असत. मराठी (ऑनर्स) घेतलेले आम्ही सर्वजण एकत्रच बसत असू. अन्य महाविद्यालयांतील प्रा. रा. श्री. जोग, प्रा .वा. भा. पाठक, इत्यादी ज्येष्ठ प्राध्यापकांप्रमाणे विद्यापीठाचे प्रमुख या नात्याने डॉ. तुळपुळेही बी. ए.च्या वर्गाला अध्यापन करीत. त्यांचा स. प.मध्ये पहिला तास होता. त्या दिवशी मी आणि एक विद्यार्थिनी असे दोघेच त्यांच्या तासाला उपस्थित होतो. त्या दिवशी त्यांचा माझा गुरु-शिष्य या नात्याने संबंध आला आणि त्यांच्या मृत्यूपूर्वी ८ दिवस त्यांची–माझी भेट झाली होती, तोपर्यंत हा संबंध कायम राहिला. या काळात त्यांच्या आयुष्यात मोठे स्थित्यंतर येऊन गेले. मीही विद्यापीठात वेगवेगळया नात्यांनी काम करून निवृत्तही झालो. परंतु या ४४ वर्षांच्या काळात डॉ. तुळपुळयांचे व माझे जिव्हाळयाचे संबंध अखंड कायम राहिले. ३० ऑगस्टला त्यांचे देहावसान झाले, त्या वेळी त्यांच्या पार्थिव देहाकडे पाहताना माझ्या मनात त्यांच्या सहवासातील असंख्य आठवणींची गर्दी दाटून आली.

१९५४ मध्ये मी एम्. ए. झालो व डॉ. तुळपुळे यांच्याच मार्गदर्शनाखाली 'दासबोधाचा भाषाशास्त्रीय अभ्यास' या विषयावर पीएच्. डी.साठी अभ्यास करू लागलो. त्या वेळी विद्यापीठाचा मराठी विभाग फक्त एकाच खोलीत थाटलेला होता आणि डॉ. तुळपुळे बसत, त्याच खोलीत बसून मी माझे संशोधनकार्य करीत असे. हा निकटचा संबंध तब्बल चौदा वर्षे सतत चालू राहिला. त्यामुळे डॉ. तुळपुळयांच्या व्यक्तिमत्त्वाची आणि कार्यपद्धतीची अनेक वैशिष्ट्ये मला फार जवळून पाहता आली.

१९४२ मध्ये डॉ. तुळपुळयांनी 'यादवकालीन मराठी भाषा' या विषयावरील प्रबंध सादर करून पीएच्. डी. मिळविली आणि तेव्हापासून त्यांचे प्राध्यापकीय





अनुक्रमणिका

जीवन सुरू झाले. डी. ए. व्ही. (सोलापूर), लिंगराज (बेळगाव), राणी पार्वतीदेवी (बेळगाव), इत्यादी ठिकाणी मराठीचे प्राध्यापक म्हणून काम केल्यावर डॉ. तुळपुळे पुण्याला आले आणि नंतरची १८ वर्षे पुणे विद्यापीठात मराठीचे प्राध्यापक व विभाग प्रमुख या नात्याने त्यांच्या सुस्थिर जीवनाची वाटचाल चालू राहिली. यापुढील त्यांच्या जीवनावर ज्यांचा कायम ठसा उमटला, अशा दोन गोष्टी त्यांच्या आयुष्यात पूर्वीच घडून आल्या होत्या. आपल्या पीएच्. डी.प्रबंधासाठी त्यांनी भाषाशास्त्रीय विषय निवडला होता आणि डॉ. सु. मं. कत्रे यांच्यासारख्या भाषापंडिताचे मार्गदर्शन मिळाल्याने भाषाचिकित्सेची नवी प्रणाली त्यांना अवगत झाली होती आणि भाषाभ्यासाची जातिवंत आवड निर्माण झाली होती. त्यामुळे त्यांनी पुढील जीवनात लिहिलेल्या अनेक ग्रंथांच्या संपादनात भाषाचिकित्सा हा एक महत्त्वाचा घटक सदैव कायम राहिलेला दिसतो.

त्याहीपेक्षा महत्त्वाची दुसरी घटना, म्हणजे गुरुदेव रा. द. रानडे यांच्यासारख्या आधुनिक काळातील. थोर ज्ञानी संतपुरुषाच्या सहवासाने त्यांच्या मनात संतवाङ्मयाविषयी केवळ अभ्यासाचीच नव्हे, तर निरतिशय श्रद्धेची भावना निर्माण झाली होती. गुरुदेव रानड्यांनी गुरुकृपा, अनेक वर्षांचे विविध भाषांतील संतवाङ्मयाचे परिशीलन आणि नामस्मरणाची उपासना या बळावर संतसाहित्याचे एक थोर भाष्यकार म्हणून आदराचे स्थान मिळविले होते. त्यांच्या संतसमीक्षेतील 'साक्षात्कारवादा'च्या प्राणभूत विचाराने डॉ. तुळपुळयांच्या संतसाहित्यलेखनावर फार मोठा प्रभाव पाडला होता. ग्रंथस्वरूपात किंवा स्फुट लेखनाच्या स्वरूपात संतसाहित्यासंबंधी लिहिताना त्यांच्या मनात हे साक्षात्कारवादाचे सूत्र पक्के दृढमूल झाल्याचे सतत जाणवते.

या दोन गोष्टींमुळे भाषाविचार आणि संतसाहित्यविचार ही डॉ. तुळपुळे यांच्या अभ्यासाची क्षेत्रे निश्चित झाली आणि तीच शेवटपर्यंत कायम राहिली. 'मराठी निबंधकार' किंवा 'मराठी निबंधाची वाटचाल' यांसारख्या काही पुस्तकांचे संपादन त्यांनी केले असले, तरी १९५० नंतर ते आधुनिक वाङ्मयाच्या कोणत्याही शाखेकडे फिरकले नाहीत. पदवीपरीक्षेसाठी किंवा पदव्युत्तर वर्गासाठी अध्यापन करतानाही ते भाषाविज्ञान किंवा मध्ययुगीन वाङ्मय हेच अभ्यासक्रम निवडीत.

त्या वेळी अध्यापनाच्या कामासाठी त्यांना फार वेळ द्यावा लागत नसे आणि विद्यार्थिसंख्याही अतिशय मर्यादित असल्याने प्रशासकीय कामातही फार वेळ दवडावा लागत नसे. विद्यापीठ परिसरातच वास्तव्य, हाताशी जयकर ग्रंथालयासारखे समृद्ध ग्रंथालय आणि संशोधनासाठी मिळणारी भरपूर सवड यांचा डॉ. तुळपुळयांनी फार चांगला फायदा करून घेतला. किंबहुना १९५० नंतर 'ज्ञानोपासना' ही त्यांची एकमेव निष्ठा झाली होती, असे म्हणण्यात यत्किंचितही अतिशयोक्ती नाही. दररोज

सकाळी तीन तास आणि दुपारी तीन तास असे किमान सहा तास त्यांचे लेखनाचे काम चालू असे. पुण्यातील साहित्यिक किंवा साहित्यसंस्था यांच्यापासून ते बव्हंशी अलिप्त राहत. बाहेरच्या संस्थांची बाब सोडाच, विद्यापीठाच्या राजकारणातही ते अगदी जरुरीपुरतेच सहभागी होत. कुलगुरूचे पद सन्मानाचे असल्याने समाजातील सर्वादरणीय अशाच व्यक्ती त्या काळात कुलगुरूचे पद भूषवीत असत. गेल्या काही वर्षांत विद्यापीठात अनेक राजकारणी लोकांनी घुसखोरी करून विद्यापीठाची प्रतिमा मलिन करून टाकली, तसा प्रकार त्या वेळी नव्हता. विद्यापीठाचे विभागही शैक्षणिक कार्यातच मग्न झालेले असत. डॉ. तुळपुळे तर सर्व वेळ आपल्या संशोधनातच व्यग्र झालेले दिसत. काही कामासाठी येणारे पुण्यातील वा बाहेरचे प्राध्यापक मराठी विभागात येऊन गप्पागोष्टींत रंगले आहेत, असे दृश्य फार क्वचितच दिसे. काम झाल्याबरोबर समोरच्या व्यक्तीला निरोप देण्याची डॉ. तुळपुळयांची नेहमीची पद्धत होती. त्यामुळे त्यांचे वागणे काहींना तुटक वाटत असे; पण त्यामुळेच त्यांच्या हातून प्रचंड लेखनकार्य होऊ शकले.

त्या वेळच्या कायद्याप्रमाणे ते प्रारंभापासून अखेरपर्यंत मराठी अभ्यास मंडळाचे पदसिद्ध अध्यक्ष होते. प्रसंगोपात्त मराठीशी संबंधित अशा काही समित्यांवरही ते काम करीत. परंतु निवडणुकांच्या राजकारणात पडून आणखी काही पदे मिळवावीत, असे त्यांना कधीच वाटले नाही. काही मित्रांच्या आग्रहासाठी त्यांनी एकदाच 'डीन' ची निवडणूक लढविली होती, आणि आयुष्यात एकही स्वतंत्र पुस्तक ज्याने लिहिले नाही, अशा एका मराठीच्याच प्राध्यापकाकडून ते पराभूत झाले. पण ते अपयश त्यांनी, अंगावरील ढेकूण झटकून टाकावा, इतक्या सहजतेने झटकून टाकले. निवडणुकीचा निकाल दुपारी १।-२ च्या सुमारास लागला आणि लगेच तो मनातून काढून टाकून तुळपुळे नेहमीप्रमाणे तीनच्या सुमारास विभागात आले आणि त्यांनी आपले लेखनकार्य, काही घडलेच नाही, इतक्या सहजतेने पुढे चालू केले.

त्या वेळी त्यांनी मराठीतील प्राचीन शिलालेख-ताम्रपटाविषयीचा एक महत्त्वाकांक्षी संशोधन प्रकल्प हाती घेतला होता. सुमारे १० वर्षे सतत काम करून १९६३ मध्ये त्यांनी तो पूर्ण केला आणि विद्यापीठाच्या वतीनेच तो 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या नावाने प्रसिद्ध झाला. १३५० पर्यंतच्या काळातील पूर्वी उल्लेखित झालेल्या आणि नव्याने उपलब्ध झालेल्या ७६ कोरीव लेखांचा समग्र अभ्यास असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. प्रत्येक लेखाचा ठसा अभ्यासकांना उपलब्ध करून देणे हे या ग्रंथाचे फार महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. हे सर्व लेख शोधणे, त्यांचे ठिकठिकाणी जाऊन ठसे घेणे, त्यांचे परिश्रमपूर्वक वाचन करणे आणि सर्व दृष्टींनी त्यातील आशयाची चर्चा करणे या सर्व कामांत डॉ. तुळपुळयांनी दहा वर्षे अविश्रांत मेहनत घेतली आणि त्यातून मराठी भाषेला भूषणभूत असा हा संशोधन-ग्रंथ सिद्ध झाला. प्रत्येक लेखाचा

उपलब्धी व पूर्वसंपादन, वर्णन, अक्षरवटिका व लेखनपद्धती, भाषा, कालनिश्चिती, आशय व चर्चा आणि समारोप इतक्या अंगांनी यात विचार केलेला आहे. या सर्व लेखांचे सर्वांगीण समालोचन करणारी १३० पृष्ठांची प्रस्तावना जरी चाळली, तरी या ग्रंथामागे केवढे अथक कष्ट उभे आहेत, त्याची कल्पना येते. केवळ या एका ग्रंथाने डॉ. तुळपुळे यांचे नाव मराठी वाङ्मयेतिहासात चिरस्मरणीय झाले असते, एवढे महनीय कार्य या त्यांच्या ग्रंथराजाने केलेले आहे.

कोरीव लेखांची जमवाजमव चालू असतानाच कै. वि. ल. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वत' या वाङ्मयेतिहासाला पुरवणी जोडण्याचे काम त्यांनी १९५१ मध्ये पूर्ण करून तो इतिहास अद्ययावत करून अभ्यासकांच्या हाती दिला होता. पुन्हा १९६३ मध्ये दुसऱ्यांदा आणि १९८२ मध्ये तिसऱ्यांदा पुरवणी जोडण्याचे काम त्यांना करावे लागले. प्रत्येक वेळी तोपर्यंतच्या नव्या संशोधनाची दखल घेऊन डॉ. तुळपुळे ती आपल्या पुरवणीत समाविष्ट करीत. १९८२ ची पुरवणी एवढी वाढली, की प्रकाशकांना कै. भाव्यांच्या मूळ सारस्वताचा एक खंड व डॉ. तुळपुळयांच्या पुरवणीचा दुसरा खंड, अशा दोन भागांत तो प्रकाशित करावा लागला. या निमित्ताने डॉ. तुळपुळयांनी मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे जे बारकाईने परिशीलन केले होते, त्या अनुभवाच्या बळावर त्यांनी पाश्चात्त्य अभ्यासकांना मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा सुमारे पावणेदोनशे पानांच्या इंग्रजी ग्रंथाच्या द्वारा रेखीव परिचय करून दिला आहे. ('Classical Marathi Literature') या नावाने हा ग्रंथ मोठ्या देखण्या स्वरूपात प्रकाशित झाला आहे.

या मध्ययुगीन कालखंडातील साहित्यामध्ये संतसाहित्य आणि महानुभाव पंथाचे साहित्य हे दोन विभाग डॉ. तुळपुळयांच्या खास अभ्यासाचे विषय होते. ह. ना. नेने, डॉ. वि.भि. कोलते या विदर्भातील अभ्यासकांनी महानुभाव पंथ आणि त्या पंथाची वाङ्मयसेवा यांचे संशोधन, संपादन सातत्याने चालविले होते. त्या पंथाचे ललित साहित्य, तात्त्विक ग्रंथ, त्यांचे तत्त्वज्ञान, आचारधर्म यांची अभ्यासपूर्ण ओळख या पंडितांनी करून दिली होती, तथापि, त्या पंथाविषयी सर्वांगांनी विवेचन करणारा ग्रंथ सिद्ध झालेला नव्हता, डॉ. तुळपुळयांनी आपल्या 'महानुभाव पंथ व त्याचे वाङ्मय' या पुस्तकाने ही उणीव भरून काढली आणि महानुभाव पंथाचे सम्यक् दर्शन एकाच पुस्तकात घडविले.

महानुभाव पंथीयांनी रचलेले गद्य-पद्य ग्रंथ प्रकाशित होऊ लागल्यानंतर क्रमाक्रमाने त्यांचा महाविद्यालयीन अभ्यासक्रमामध्येही समावेश होऊ लागला. डॉ. तुळपुळयांनीही बी. ए. व एम्. ए. च्या विद्यार्थिवर्गाला उपयुक्त ठरतील, अशा अनेक महानुभाव ग्रंथांचे संपादन केलेले आहे. त्या पंथाचे प्रवर्तक श्रीचक्रधर यांच्या जीवनातील घटनांचे निवेदन करणाऱ्या लीळा-चरित्र ग्रंथाची संहिता प्रकाशित झाली

होती. डॉ. तुळपुळ्यांनी ते लीळा-चरित्र एकांक, पूर्वार्ध (भाग १ व २) आणि उत्तरार्ध (भाग १ व २) अशा पाच भागांत प्रसिद्ध केले. त्याचप्रमाणे ऋद्धिपूरवर्णन, दृष्टांतपाठ, स्मृतिस्थळ, महानुभाव गद्य, महानुभाव पद्य असे अनेक संपादित ग्रंथही तयार केले. ही संपादने मुख्यतः महाविद्यालयीन व विद्यापीठीय विद्यार्थ्यांसाठी तयार केलेली असली, तरी डॉ. तुळपुळे त्यांचे संपादन मात्र सर्वच स्तरांवरील अभ्यासकांना उपयुक्त होईल, अशा पद्धतीने करीत. त्यासाठी ते भरपूर पूर्वतयारी करीत. प्रत्येक संहितेला ते विस्तृत प्रस्तावना जोडत आणि संपादित कृतीषियीच्या सर्व बाजूंचा समग्र तपशील समाविष्ट करीत. टीपग्रंथातील उतारे, अर्थस्पष्टीकरणात्मक टीका, साहित्यगुणांच्या दृष्टीने रसग्रहण, त्या कृतीतून प्रकट होणारे समाजदर्शन, भाषिक विशेष, अशी विविध स्वरूपाची भरगच्च सामग्री अत्यंत पद्धतशीरपणे व ससंदर्भ देण्याची त्यांची प्रथा होती. कठीण शब्दांचा अर्थ देणारा शब्दकोश न चुकता जोडत. लीळाचरित्रामध्ये चक्रधरांच्या भ्रमंतीचे दिग्दर्शन करणारा नकाशा तयार करवून घेऊन, त्यांनी तो प्रत्येक भागाला जोडला होता. तसा उपक्रम बहुधा तत्पूर्वी कोणीही केला नसावा.

मध्ययुगीन काळात मराठी कोशरचनेला प्रारंभ झाला होता. ज्ञानेश्वरीतील निवडक कठीण शब्दांचे अर्थ नमूद करणारे अनेक कोश तयार झाले होते. डॉ. तुळपुळे यांनी तंजावरच्या सरस्वतीमहाल ग्रंथालयाला भेट देऊन काही कोशांच्या नकला करवून घेतल्या होत्या. त्यांपैकी रामकवी याने रचलेला 'भाषाप्रकाश' आणि 'काळेराव आप्पा याने रचलेला 'अकारादि प्राकृत भाषेचा निघंटु' हे दोन कोश त्यांनी संपादित केलेले आहेत. त्यांच्या नेहमीच्या संशोधन-पद्धतीला अनुसरून दोन्ही कोशांच्या अंतरंगाची सारी वैशिष्ट्ये नमूद करणाऱ्या विस्तृत प्रस्तावनांची जोड दोन्ही कोशांना दिलेली आहे. हे दोन्ही कोश सामान्यतः सतराव्या शतकाच्या सुमाराचे आहेत आणि मध्ययुगीन वाङ्मयातील अनेक दुर्बोध शब्दांचा अर्थ उलगडण्याच्या दृष्टीने आजही अभ्यासकांना सहाय्यक ठरणार आहेत. अनेक शब्दांचे पुन्हा पुनरुज्जीवन करण्यासारखे आहे. सरस्वतीमहालाच्या हस्तलिखित संग्रहाची पाहणी करताना त्यांना माधवस्वामी या आपल्याकडील दासोपंताप्रमाणे अफाट रचना करून ठेवणाऱ्या कवीचे साहित्य दृष्टीस पडले. त्यांपैकी 'योगवासिष्ठ' ग्रंथाची नक्कल मागवून घेऊन त्यांनी पुणे विद्यापीठाच्या वतीने तो ग्रंथ दोन भागांत संपादून प्रसिद्ध केला. वेगवेगळया निमित्ताने डॉ. तुळपुळयांनी मध्ययुगीन वाङ्मयाचे अवलोकन केलेले असले, तरी संतवाङ्मय हा त्यांच्या खास जिव्हाळयाचा विषय होता.

'पाच संतकवी' हा त्यांचा संतवाङ्मयविषयक ग्रंथ सर्वच दृष्टींनी पहिला आहे. संतवाङ्मयाच्या अभ्यासाचा त्यांचा विशिष्ट दृष्टिकोण होता आणि तो त्यांनी गुरुदेव रानडे यांच्या सहवासाने व त्याहीपेक्षा त्यांच्या 'महाराष्ट्रातील साक्षात्कारवाद'





अनुक्रमणिका

[(Mysticism in Maharashtra)] या ग्रंथाच्या सूक्ष्म अध्ययनाने आत्मसात केला होता. गुरुदेव रानड्यांनी आपल्या ग्रंथात वारकरी संतांच्या बरोबरीने समर्थ रामदासांनाही गुरुस्थानी मानले होते, यामुळे डॉ. तुळपुळे यांच्या संतसाहित्य-विचारात प्रारंभापासूनच सर्वसमावेशक असा उदार दृष्टिकोण आलेला आहे. तथापि, गुरुदेव रानडे किंवा त्यांच्या संप्रदायातील मंडळी संतवाङ्मयाकडे साहित्यकृती या दृष्टीने न पाहता जीवनाला कृतार्थता प्राप्त करून देणारे दीपस्तंभ अशा भावनेने पाहत असत. स्वाभाविकच संतसाहित्याचा केवळ वाङ्मयकृती म्हणून आस्वाद घेणे किंवा त्यातील गुणदोषांचे विवरण करणे ही भूमिका त्यांनी स्वीकारली नाही. डॉ. तुळपुळे मराठीचे प्राध्यापक असल्याने संतसाहित्याच्या वाङ्मयीन गुणवत्तेची त्यांना चांगली जाण होती. पाच संतकवींच्या साहित्याची चर्चा करताना त्यांनी प्रत्येक संताच्या संदर्भात 'काव्यसंपदा', 'काव्यसौंदर्य', 'कवित्व', 'काव्य' यांपैकी एखादे शीर्षक देऊन त्या त्या संतकवीच्या लेखनातील सौंदर्यस्थळांचा सोदाहरण परामर्श घेतलेला आहे. तरीही त्यांच्या मते संतवाङ्मयाचा खरा अर्थ 'परमार्थ' हाच आहे आणि म्हणून सारस्वताला पुरवण्या जोडताना, पाच संतकवी ग्रंथ लिहिताना, किंबहुना स्फुट लेखनातही त्यांनी संतांच्या पारमार्थिक भूमिकेचा आणि शिकवणीचाच प्राधान्याने आणि विस्ताराने विचार केला आहे. वाङ्मयीन रसास्वाद हा त्यांनी गौणच मानला. गेल्या काही वर्षांत प्रा. सरदार, श्री. सुंठणकर, इत्यादी अभ्यासकांनी संतवाङ्मयामुळे झालेल्या सामाजिक परिणामांवर भर देऊन संतवाङ्मयाची थोरवी विशद करण्याचा प्रयत्न केला. या भूमिकेशीही डॉ. तुळपुळे सहमत नव्हते. वारकरी संतांच्या काव्यात अधूनमधून येणारे सामाजिक स्वरूपाचे उल्लेख किंवा समर्थ रामदासांच्या काव्यातील राजकीय विचार यांना सर्वाधिक महत्त्वाचे स्थान देणे हे चुकीचे असून संतसाहित्यातील परमार्थच समजावून घेतला पाहिजे, असा डॉ. तुळपुळे यांचा आग्रह त्यांनी अनेक ठिकाणी निःसंदिग्धपणे व्यक्त केलेला आहे. गुरुदेव रानडे यांच्या पारमार्थिक तत्त्वज्ञानाचे वर्णन करताना ते 'विवेकमूलक, नीतिप्रधान, आत्मसाक्षात्कारपर्यवसायी नामस्मरणात्मक भक्तियोग' असे करण्यात येते. डॉ. तुळपुळ्यांनी आपल्या संतसाहित्यासंबंधीच्या सर्व लेखनात हेच सूत्र मनाशी बाळगून आपले लेखन केलेले आहे.

'पाच संतकवी' या ग्रंथापूर्वी महाराष्ट्रात सुमारे पन्नास वर्षे वि. ल. भावे, पांगारकर, आजगावकर अशा अनेकांचे संतकवींसंबंधीचे ग्रंथ प्रकाशित झाले होते. नंतरच्याही काळात डॉ. पेंडसे, प्रा. माटे, न. र. फाटक, डॉ. वाळिंबे अशी नामवंत मंडळी संतांच्या अभ्यासाचे आपापले निष्कर्ष ग्रंथस्वरूपात वाचकांसमोर ठेवीत होती. अशाही स्थितीत 'पाच संतकवी' या ग्रंथाच्या तीन आवृत्त्या निघाल्या, ही एकच गोष्ट त्याच्या लोकप्रियतेची आणि गुणाढ्यतेची द्योतक आहे. प्रत्येक संताविषयी विवेचन करताना डॉ. तुळपुळे यांनी चरित्र, तत्त्वज्ञान, नीतिमीमांसा,

साक्षात्कारमार्ग आणि काव्यगुण अशा महत्त्वाच्या पैलूंची साधार आणि पद्धतशीर मांडणी केलेली आहे. त्यांच्या रसाळ भाषाशैलीने ग्रंथाचे सर्व थरांत स्वागत झाले. कोणतीही एकांगी भूमिका न घेता प्रत्येक संताच्या जीवनकार्याचे आणि पारमार्थिक शिकवणुकीचे प्रसन्न भाषेत विवेचन करण्याच्या पद्धतीमुळे या एकाच ग्रंथाने डॉ. तुळपुळ्यांचे नाव संतवाङ्मयाच्या समीक्षकांमध्ये आदरपूर्वक घेण्यात येऊ लागले. 'भक्तीचा मळा' या संतविषयक स्फुट लेखसंग्रहानंतर त्यांनी संतांच्या अभंगवाणीतील निवडक रत्ने अभ्यासकांना उपलब्ध करून देण्याचे ठरविले आणि सर्व संतांनी लिहिलेल्या १६ हजार अभंगांतून ७०० अभंगांचा संग्रह 'अभंगवाणीतील पंथराज' या नावाने प्रसिद्ध केला. या अभंगांची निवड करतानाही त्यांनी डॉ. रानडेप्रणीत परमार्थसाधनेचेच मुख्य सूत्र मनाशी बाळगले हाते. त्यांचा संतसाहित्याचा गाढ अभ्यास आणि अभंगांच्या प्रचंड खजिन्यातून विशिष्ट साधनमार्गावरून वाटचाल करण्यासाठी अवश्य तेच अभंग वेचून काढण्याची मार्मिक दृष्टी या दोन्हींचा प्रत्यय या संग्रहात येतो. एकूण मराठी अभंग साहित्याचे गुणविशेष विशद करणारी त्यांची प्रदीर्घ प्रस्तावनाही अभ्यासकांना मार्गदर्शक ठरणारी आहे.

विद्यापीठाच्या सेवेतून मुक्त झाल्यावर डॉ. तुळपुळ्यांनी संशोधन - लेखनाचे काम दुप्पट उत्साहाने सुरू केले. विद्यापीठात असतानाच त्यांचा आल्फ्रेड मास्टर, रैसाइड यांसारख्या मराठीप्रेमी पाश्चात्त्य अभ्यासकांशी पत्रद्वारा संपर्क चालू असे. निवृत्तीनंतर मराठीच्या पाश्चात्त्य अभ्यासकांना मार्गदर्शन करणे हा त्यांच्या दैनंदिन जीवनाचाच एक भाग होऊन बसला. त्या अभ्यासकांपैकी गुन्थर सोन्थायमर या जर्मन अभ्यासकाशी झालेल्या परिचयाचे रूपांतर गाढ स्नेहात झाले आणि सोन्थायमर त्यांना बंधुतुल्य गुरू मानू लागले. या स्नेहभावातून जर्मनीतील हायडेलबर्ग विद्यापीठात जाऊन तेथील विद्यार्थ्यांना मराठीबद्दल विशेषतः संतवाङ्मयासंबंधी मार्गदर्शन करण्याची कल्पना निघाली आणि डॉ. तुळपुळे प्रतिवर्षी अभ्यागत प्राध्यापक या नात्याने हायडेलबर्गला जाऊन राहू लागले. त्यांच्या अशा दहा फेऱ्या झाल्या. या काळात त्यांनी अनेक विद्यार्थ्यांना प्राचीन मराठीची, विशेषतः संतसाहित्याची विस्ताराने ओळख करून दिली आणि त्यातील पारमार्थिक भूमिका अधिकारवाणीने विशद करून सांगितली. डॉ. तुळपुळे मराठीचे प्राध्यापक असले, तरी इंग्रजीवर त्यांचे पहिल्यापासूनच चांगले प्रभुत्व होते. सफाईदार इंग्रजीत लेखन करणे किंवा तास-दीडतास अस्खलित इंग्रजी व्याख्यान देणे या गोष्टी ते सराईताप्रमाणे सहज करीत. (प्रा. द. गो. कर्वे पुणे विद्यापीठाचे कुलगुरू असताना प्रत्येक विभागप्रमुखाने आपल्या आवडत्या विषयावर सर्व विभागप्रमुखांसमोर एक व्याख्यान द्यावे, अशी कल्पना प्रा. कर्व्यांनी सुचविली होती. त्या वेळी मराठी विभागातच, कुलगुरू व इतर प्रमुखांच्या उपस्थितीत डॉ. तुळपुळ्यांनी ('Pandharpur through inscriptions') या विषयावर

तासभर उत्कृष्ट व्याख्यान दिल्याची मला अजूनही चांगली आठवण आहे.) हायडेलबर्गला अनेक वर्षे त्यांनी संतसाहित्यावर जी व्याख्याने दिली, ती एका सूत्रात चपखलपणे बसवून डॉ. तुळपुळयांनी ('Mysticism in Medieval Indian Literature') हा सुमारे तीनशे पृष्ठांचा ग्रंथ प्रसिद्ध करून भारतातील संतसाहित्याचे, त्यांच्या रेखीव पद्धतीने विश्लेषण केले. सोन्थायमर प्रतिवर्षी भारतात येत आणि आपल्या ३/४ महिन्यांच्या वास्तव्यात दररोज डॉ. तुळपुळयांच्या बरोबर बसून म्हाइंभटकृत लीळाचरित्राचे इंग्रजीत भाषांतर करीत. सोन्थायमर यांच्या अकाली आणि आकस्मिक निधनामुळे हे काम थांबले आणि आता तर तुळपुळेही गेल्यामुळे लीळाचरित्राचा उत्कृष्ट अनुवाद प्रसिद्ध करण्याचा संकल्प कायमचाच बाजूला पडल्यासारखा झाला आहे.

हायडेलबर्ग येथे असताना त्यांची व्याख्याने इंग्रजीतच होत. परंतु जर्मनीत राहावे लागणार आहे, तेव्हा जरुरीपुरते जर्मन भाषेत बोलता यावे, यासाठी डॉ. तुळपुळयांनी पुण्याच्या मॅक्समुल्लर भवन येथील जर्मन भाषेचा पदविका अभ्यासक्रम पुरा केला होता. वयाच्या ७०व्या वर्षी ते नियमितपणे बसने तेथे जाऊन ती व्याख्याने ऐकत व टिपणे घेत. पंच्याहत्तरीच्या सुमारास त्यांना सिमला येथील इन्स्टिट्यूटची तीन वर्षांची एक संशोधनवृत्ती मिळाली होती. त्यासाठी ते वर्षातील काही महिने सिमल्याला जाऊन राहत.

गुरुदेव रानड्यांच्या संप्रदायात 'सबीज नामस्मरण' या प्रक्रियेला पारमार्थिक साधनेत प्राणभूत महत्त्वाचे स्थान होते. मनावर तो अनेक वर्षांचा प्रभाव असल्याने डॉ. तुळपुळयांनी आपल्या संशोधनासाठी 'नामभक्ती' हाच आशय असलेला विषय निवडला होता आणि तीन वर्षे काम केल्यावर संशोधनाचे फलित म्हणून आपला टंकलिखित ग्रंथ संस्थेच्या स्वाधीन करूनच तुळपुळयांनी आपली संशोधनवृत्ती पूर्णतया सफल केली. हा ग्रंथ संस्थेने नंतर प्रकाशितही केला.

डॉ. तुळपुळे यांच्या संशोधनाचा प्रारंभ 'यादवकालीन मराठी भाषा' या प्रबंधाने झाला. विद्यापीठामध्ये असताना भाषाशास्त्राचे अध्यापन करण्याचे काम बव्हंशी तेच करीत. पीएच्. डी.चे मार्गदर्शक म्हणून त्यांना मान्यता मिळालेली होतीच. हे मार्गदर्शन करतानाही त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना भाषाशास्त्र किंवा संतसाहित्य यातीलच विषय घेण्यास प्रवृत्त केले व योग्य ते मार्गदर्शन करून त्यांच्याकडून संशोधनकार्य पूर्ण करून घेतले. परंतु भाषाशास्त्रविषयक स्वतंत्र मराठी ग्रंथ मात्र त्यांच्या हातून लिहून झाला नाही. त्यांच्या भाषाविषयक एका इंग्रजी ग्रंथाचा मात्र आवर्जून उल्लेख केला पाहिजे. १९५५ पासून डॉ. सु. मं. कत्रे यांच्या पुढाकाराने पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये प्रतिवर्षी मे-जून महिन्यात सहा आठवड्यांचे भाषाशास्त्राच्या वर्गाचे आयोजन होत असे. भाषाशास्त्रातील नवीन विचारप्रणालींचा





अनुक्रमणिका

अभ्यास करून, तरुण अभ्यासकांनी 'भारतीय भाषा सर्वेक्षण' करावे, असा यामागील मूळ उद्देश होता. या वर्गांना अध्यापन करण्यासाठी डॉ. सुनीतिकुमार चतर्जी, डॉ. सुकुमार सेन, डॉ. धीरेंद्र वर्मा, इ. भारतीय कीर्तीचे भाषापंडित येत. डॉ. तुळपुळेही अधूनमधून या मंडळींना भेटण्यासाठी येत. या मंडळींबरोबर झालेल्या चर्चेमध्ये प्रत्येक भाषेचा इंग्रजीत परिचय करून देणारी एक ग्रंथमाला काढावी, अशी एक कल्पना निघाली. इतर भाषेतील मंडळींनी ती कितपत साकार केली, याची कल्पना नाही, परंतु डॉ. तुळपुळयांनी मात्र उत्साहपूर्वक हे काम हाती घेतले आणि ("An Old Marathi Reader') या नावाने यादवकालीन साहित्यातील निवडक उताऱ्यांच्या आधारे मराठीची भाषिक वैशिष्ट्ये विशद करणारा ग्रंथ सिद्ध केला. त्याला डॉ. चतर्जींनीच प्रस्तावना लिहिलेली आहे. त्यात ते म्हणतात,

"The fine scholarship as well as the very methodical arrangement which are behind this volume certainly make it an important landmark in the field of linguistic studies in India of the present day, since a work of this type may still be said to form a desideratum for most of our modern Indian languages.")

डॉ. तुळपुळयांनी मराठीत भाषाविषयक नवीन ग्रंथ लिहिला नसला, तरी आपल्या पीएच्. डी. प्रबंधाची नवीन आवृत्ती मात्र १९७३ मध्ये प्रकाशित केली. १९४४ च्या पहिल्या आवृत्तीपेक्षा या आवृत्तीत त्यांनी इतके बदल केले आणि इतकी नवीन भर घातली, की ते पुनर्मुद्रण न वाटता नवीनच ग्रंथ वाटावा. साहित्य संस्कृती मंडळाच्या विनंतीवरून इतिहासाचार्य राजवाडे यांनी लिहिलेल्या 'ज्ञानेश्वरीतील मराठी व्याकरण' या ग्रंथाचे नव्याने संपादन करण्याचे काम त्यांनी स्वीकारले आणि राजवाड्यांच्या विवेचनाची वैशिष्ट्ये आणि त्यातील त्रुटी स्पष्ट करणारी विस्तृत प्रस्तावना जोडली.

डॉ. श्रीमती ॲन फेल्डहाउस यांच्या सहकार्याने डॉ. तुळपुळयांनी "Word-Dictionary of old Marathi" या कोशाचे एक मोठे कार्य हाती घेतले होते. गेली ७-८ वर्षे त्यांनी याच कार्यात स्वतःला गुंतवून घेतले होते. विद्यापीठात असताना हाती घेतलेली; परंतु अपूर्ण अवस्थेत पडून राहिलेली ही योजना मराठी-इंग्रजी अशा वेगळ्या स्वरूपात पूर्ण करावी, असा त्यांचा मनोदय होता; आणि आपल्या नेहमीच्या संशोधनाची शिस्त, कामातील वक्तशीरपणा आणि सातत्य या स्वभाववैशिष्ट्यांच्या बळावर जवळजवळ एकहाती असे हे कोशकार्य पुरे झाले आणि त्याची मुद्रणप्रत तयार होऊन छपाईलाही प्रारंभ झाला. जुलै अखेरपर्यंत, एका असाध्य व्याधीशी झगडत असतानाही, डॉ. तुळपुळे यांचे हे कोशकार्य चालू होते. त्यांची कार्यावरची निष्ठा खरोखरच जबरदस्त होती आणि त्याच्या बळावरच त्यांनी

हे काम पूर्ण करीत आणले होते. एका अमेरिकन संस्थेचे भक्कम आर्थिक पाठबळ असल्याने आणि ॲन फेल्डहाउस यांच्यासारखी उत्साही विदुषी त्याचा पाठपुरावा करीत असल्याने कोश लवकरच मोठ्या आकर्षक स्वरूपात प्रकाशित होईल आणि प्राचीन मराठीच्या अभ्यासकांना एक सदैव संग्राह्य असा संदर्भ ग्रंथ उपलब्ध होईल; परंतु ज्यांच्या अनेक वर्षांच्या अविश्रांत प्रयत्नांतून हा कोश सिद्ध झाला, ते डॉ. तुळपुळे मात्र कोशाची प्रकाशित झालेली प्रत पाहण्यास हयात नाहीत, हा केवढा दैवदुर्विलास!

आयुष्याची पन्नास वर्षे तपःस्वाध्यायनिरत असे जीवन व्यतीत करणाऱ्या गुरुवर्य तुळपुळे यांना विनम्र अभिवादन.

**३८४/१, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३० दूरभाष : ४५२५२२**

## डॉ. शं. गो. तुळपुळे, यांच्या लेखनाची सूची

५.२.१९१४ एम्. ए., पीएच् डी.. डी. ए. व्ही. कॉलेज, सोलापूर, सिडनहॅम कॉलेज, मुंबई, पार्वतीबाई कॉलेज, बेळगाव येथे मराठीचे अध्यापन. १९५० ते ६८ पर्यंत पुणे विद्यापीठात मराठी विभाग प्रमुख. काही वर्षे हायडेल्बर्ग (जर्मनी) येथे अभ्यागत प्राध्यापक. १९८६ पासून सिमला येथील भारतीय उच्च अध्ययन संस्थान मध्ये अध्यापन व संशोधन. इंग्रजी ग्रंथलेखन.

**अभंगवाणीतील पंथराज. (निवृत्ति ते निळोबा)** सिटी बुक स्टॉल, पुणे. १९७०. १. १६+२०४. रु. १२.

**आत्मशोधन.** विदर्भ मराठवाडा, पुणे. १९८०. १. २३८ रु. ८. संत ऑगस्टीन यांच्या Confessions या ग्रंथाचा अनुवाद.

**केशिराज - संकलित दृष्टान्तपाठ.** सुविचार, नागपूर. १९६४. १. १४४. रु. ५. संपादन.

**गुरुदेव रा. द. रानडे : चरित्र आणि तत्त्वज्ञान.** यशवंत, पुणे. १९८३. ३ (१९५८) १६+४०६. रु. ४०.

**श्री चक्रधर - निरूपित श्रीकृष्ण चरित्र.** व्हीनस, पुणे. १९७३. १. ५२+२०८. संपादन.

**नारायण व्यास बहाळियेकृत श्री ऋद्धिपूर वर्णन.** सुविचार, नागपूर. १९६७. १. ८+११९. रु. ८. संपादन.

**पाच संतकवी.** सुविचार, पुणे. १९८४. ३ (१९४८-) १४+५०८. रु. ९०.

**प्रवास.** सुविचार, नागपूर. १९६४. १. ८+२५६. रु. ७ वाङ्मयीन लेखसंग्रह.

**प्राचीन कोरीव मराठी लेख (मराठी ताम्र-शिलालेखांची बाह्यांग परीक्षा)** मराठी संशोधन पत्रिका, वर्ष ४, अंक ३-मधून पुनर्मुद्रित १९५७.

**प्राचीन मराठी कोरीव लेख.** पुणे विद्यापीठ, पुणे. १९६३. १. १३८+४८० रु. ५०.

**प्राचीन मराठी गद्य.** व्हीनस, पुणे १९६१. २ (१९४९). १६+२२२. रु. ५. संपादन.

**भक्तीचा मळा.** काँटिनेन्टल, पुणे. १९६०. १. १०+१८८ रु. ४. संतविषयक लेखांचा संग्रह.

**भाषिक प्रश्नावली** (मराठी बोलींच्या अभ्यासार्थ), पुणे विद्यापीठ १९६०.

**मराठी ग्रंथनिर्मितीची वाटचाल.** महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था, पुणे. १९७४. १. १२+२१२. रु. १५. ग्रंथनिर्मितीविषयक.

**मराठी निबंधकार.** कर्नाटक पब्लि. हाऊस, मुंबई. १९४४. २ (१९३९). १८+२१०. संपादन.

**मराठी भाषेचा तंजावरी कोश,** व्हीनस प्रकाशन, पुणे १९७३ पृ. १७९

**मराठी वाङ्मयाचा इतिहास.** खंड १. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे. १९८४. १. १९+८१०. रु. १२५. आरंभापासून ते १३५० पर्यंतचा वाङ्मयाचा इतिहास. संपादन.

**मराठी व्याकरणाची मूलतत्त्वे.** सिटी बुक स्टॉल, पुणे. १९६६. ४ (१९६३) १२+३०८. रु. ६ मूळ लेखक ग. ह. केळकर. संपादन.

**मराठी शब्दावली** (मराठी बोलींच्या अभ्यासार्थ), पुणे विद्यापीठ, डिसेंबर १९६०.

**महानुभाव गद्य.** विदर्भ मराठवाडा, पुणे. १९७०. पुनर्मुद्रण.(१९६९) २५८ रु. ५ संपादन.

**महानुभाव पंथ आणि त्याचे वाङ्मय.** व्हीनस, पुणे. १९७६. १. २०+३५५. रु. ३५.

**महाराष्ट्र सारस्वत- खंड १.** पॉप्युलर, मुंबई. १९८२. ६ (१८९८- ) ४०+६१६. मूळ लेखक वि. ल. भावे. संपादन.

**महाराष्ट्र सारस्वत- खंड २.** पॉप्युलर, मुंबई. १९८३. ६ (१८९८-) १०+६३९-१११३ दोन्ही खंड. मिळून रु. १५०. पुरवणी खंड. लेखन.

**माधवस्वामीकृत योगवासिष्ठ. भाग १** (प्रकरणे १ ते ५ ) पुणे विद्यापीठ,पुणे. १९५८. १. ९+२४७. रु. ७. संपादन.

**माधवस्वामीकृत योगवासिष्ठ, भाग २.** संपादन. स्मृतिस्थळ. वि. गं. कुलकर्णी, पुणे. १९६९. १. १२५. रु. ५. संपादन.

**यादवकालीन मराठी भाषा.** के. भि. ढवळे, मुंबई. १९४२. १. १६+३६८. रु. ४, भाषाशास्त्रीय अभ्यास. पुनर्लेखन १९७३.

**रमणमहर्षी,** नॅशनल बुक ट्रस्ट, नवी दिल्ली. १९७७. १. १६०. रु. ७.७५ कृ. स्वामिनाथन यांच्या ग्रंथाचा अनुवाद.

**रामकविकृत भाषाप्रकाश (संपादन),** पुणे विद्यापीठ, पुणे १९६२. रु. ५. पृ. ३७+११४+६८.

**राजभवन.** सेंट टेरेसाकृत Interior Castle या ग्रंथाचा अनुवाद.

**लीळाचरित्र.** एकांक. सुविचार, पुणे. १९८४. ५. (१९६४). ६+१५४. रु. २०. संपादन.

**लीळाचरित्र. पूर्वार्ध भाग १.** सुविचार, पुणे. १९८५. ३ (१९६६). ६+१४६. रु. २५. संपादन.

**लीळाचरित्र. पूर्वार्ध भाग २.** सुविचार, पुणे. १९६६. १. १०+१५५. रु. ८ संपादन.

**लीळाचरित्र. उत्तरार्ध भाग १.** सुविचार, पुणे. १९६७. १. १०+२०५. रु. १०. संपादन.

**लीळाचरित्र. उत्तरार्ध भाग २.** सुविचार, पुणे. १९६७. १. १२+२१३. रु. १०. संपादन.

**ज्ञानेश्वरी : एक प्रवास.** विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर १९७९ पृ. ३८.

**ज्ञानेश्वरीची प्रस्तावना आणि ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण,** मूळ लेखक - वि. का. राजवाडे. (संपादन) महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मिडळ, मुंबई. १९७९ पृ. १४+२७४.

**English**

1. A Grammatical sketch of Marathi (in collaboration with Dr. S.B. Kulkarni), included in Grammatical Sketches of Indian Languages with comparative vocabulary and Texts being Monograph No. 2. of Census of India 1971 Series 1.

2. An Old Marathi Reader, Venus Prakashan, Pune 1960, Pages XVi + 264.

Being a linguistic reader with a foreword by the late Prof.

Suniti Kumar Chatterji.

3. Classical Marathi Literature, Otto Harrassowith, Wiesbaden, 1979. Being vol. 9, fascicule 4 of 'A Hislory of Indian Literature', Gen-ed. Jan Gonda.

4. Mysticism in Medieval india, Wiesbaden 1984.

5. Ranade - A Modern Mystic (in collaboration with late Prof. S.R. Sharma.) Poona, 1961.

6. The Genesis of a Religious cult (in collaboration with Dr. Anne Feldhaus)- In print.

7. The Divine Name in the Indian Tradition–comparative study - forthcoming.

( मराठी सारस्वत भाग १ (संपा. श्री. अनंत लक्ष्मण जोशी) आणि डॉ. ॲन फेल्डहाऊस यांनी दिलेल्या सूची यांच्या आधारे)

○○

## विनोदबुद्धी आणि राजकारण

आचार्य कृपलानींची वाणी व लेखणी उपरोध–वक्रोक्तीच्या खेळात फार तरबेज होती. तिच्या फटकाऱ्यातून गांधी-नेहरूही सुटले नाहीत. त्यांची अशी गोष्ट सांगतात, की ते एकदा काहीशा हताशपणे म्हणाले होते, "काय करू ? या देशात विनोदबुद्धी नाही. नाही तर केवळ उपहास-उपरोधाच्या शक्तीने मी हे सरकार उलथवून टाकले असते." पी. एल्. नी आपल्या ... उपहास, उपरोध, विडंबन, वक्रोक्ती अशा विनोदाच्या सर्व साधनांचा मर्मघाती उपयोग करून सत्ताधारी पक्षाला धूळ चारण्यात महाराष्ट्रात तरी त्यांचे श्रेय मोठे आहे. मराठी माणसाच्या विनोदबुद्धीबद्दल (तर) म्हटले जाते, की तो एक वेळ मित्र गमावेल, पण त्याच्यावर कोटी अथवा विनोद करण्याची संधी सोडणार नाही.

*श्री. पु. भागवत, परमकलासिद्ध पुल, महाराष्ट्र टाइम्स, रविवार*
*१९९४ : ११ : ०६, मैफल पृ. एक, पाच मधून, पृ. पाच*
*(याच संदर्भात आचार्य अत्र्यांच्या संयुक्त महाराष्ट्राच्या उभारणीच्या वेळच्या कामगिरीची आठवण व्हावी.)*





अनुक्रमणिका

# जिवंत मराठी

– वि. द. घाटे

१९३० सालची गोष्ट: मी नुकताच विलायतेहून आलो होतो. शनिवारचा दिवस होता. दिवाणखान्यात काही तरी वाचीत बसलो होतो. इतक्यात माझे एक वृद्ध मित्र एका पाटीलबुवांना घेऊन आले व म्हणाले,

''या पाटीलबुवांना तुमचा सत्कार करायचा आहे.''

मी हातांतील काम बाजूस ठेवून पाटीलबुवांकडे तोंड केले. त्यांच्या हातांत एक हार होता. ते उभे राहिले आणि खड्या आवाजात भाषण करू लागले

''अध्यक्षमहाराज व सभ्य गृहस्थ हो, आपले सन्मान्य पुढारी विलायतेत उच्च शिक्षण संपादन करून मातृभूमीस परत आले आहेत, इत्यादी इत्यादी.''

पाटीलबुवांनी याप्रमाणे दहा मिनिटे 'ज्ञानप्रकाश' व 'केसरी'तल्या परिचित अशा मराठी भाषेत चुकतमाकत भाषण केले व शेवटी माझ्या गळयांत हार घालून त्यांनी माझा निरोप घेतला!

तो प्रसंग जितका हास्यास्पद, तितकाच माझ्या दृष्टीने चिंतनीय होता. दिवाणखान्यात आम्ही तिघेच होतो. माझ्या वृद्ध मित्रांना अध्यक्षमहाराज मानले, तरी तेथे सभ्य गृहस्थ कोणीच नव्हता. माझ्याविषयी सभ्य गृहस्थांना उद्देशून भाषण असल्याने अर्थात माझी सभ्य गृहस्थांत त्या ठिकाणी गणना होत नव्हती. स्वतः वक्ता अर्थातच सभ्य गृहस्थ होऊ शकत नव्हता. पाटीलबुवांना या अडचणींची दाद नव्हती. तो शेतात घाम गाळणारा आणि त्या शेतातच रुजलेली व शतकानुशतक पोसलेली जिवंत मराठी बोलणारा मराठा गडी मूर्खासारखा वर्तमानपत्री आणि पुस्तकी मराठी बोलत होता. गेल्या पन्नास वर्षांत शेकडो खेडी मी पाहिली आहेत व हजारो पाटीलबुवांचे कृत्रिम व पुस्तकी होत चाललेले मराठी ऐकले आहे. मला त्या त्या प्रसंगी कौतुकही वाटले आहे आणि खेदही झाला आहे.

कौतुक वाटणे साहजिकच आहे. महाराष्ट्राच्या ऐक्याच्या दृष्टीने, महाराष्ट्रीय संस्कृतीच्या ऐक्याच्या दृष्टीने या हजारो 'अध्यक्षमहाराज व सभ्य गृहस्थ' सांप्रदायिकांची पुस्तकी व त्यांना अपरिचित अशी मराठी बोलण्याची करुणास्पद





अनुक्रमणिका

धडपड मला अवश्य अभिनंदनीय वाटते. त्याचबरोबर या धडपडीच्या मागची पार्श्वभूमी व मनोवृत्ती माझ्या दृष्टीस पडते व मला खेद वाटतो.

हे खेड्यांतले लोक आपल्यासमोर असे का बोलतात? आपल्याशी अशा कृत्रिम भाषेत बोलता बोलता हळूहळू सहज ते आपसांतही तशी भाषा बोलू लागतात. हे असे का होते? याचे कारण माझ्या मते हेच आहे, की या लोकांना आपल्या खडबडीत, रसरशीत बोलीची शरम वाटते; ती बोलण्यास संकोच वाटतो, कमीपणा वाटतो व उलट पुस्तकांतील मुळमुळीत भाषा बोलण्यात भूषण व प्रतिष्ठा वाटते. या कारणाचेही एक खोल कारण आहे. या लोकांची आपल्या जीवनावरची निष्ठा व जिव्हाळा नाहीसा होत चालला आहे. उठल्यासुटल्या शहरांकडे धाव घ्यावी, असे त्यांना वाटते. शहराची शबल छाया त्यांच्या जीवनावर पडली आहे. शहरातील ते 'सिनेमे', तो 'सिंगल' चहा, ते रस्ते, ती दाटी, गडबड व गोंधळ आणि त्या दाटीतून लोकांना धक्के मारीत पुढे जाण्यात होणारी त्यांच्या हीनगंडाची तृप्ती – हे सारे त्यांना आवडू लागले आहे. शहरी लोकांचे ते अनुकरण करू लागले आहेत. म्हणूनच वेळीअवेळी 'अध्यक्षमहाराज व सभ्य गृहस्थ' पुढे डोकावतात!

रोज जगणाऱ्या जीवनावरून मन उडाले, म्हणजे त्या जीवनाच्या कुशीत निपजलेली बोली तरी जिभेवर कशी खेळेल? हळूहळू सुंदर समर्पक शब्दांना, म्हणींना, प्रयोगांना मराठी भाषा मुकू लागली आहे. कोणी माझे समाधान करतात-

'अहो, हे चालायचेच. असे व्हायचेच! भाषेला माणसाप्रमाणे जीवन आहे. माणसे बदलतात, त्यांची परिस्थिती बदलते, तशी भाषा बदलायचीच. जुन्या वस्तू जातात, जुन्या भावना मावळतात. तसे त्यांना व्यक्त करणारे शब्दही त्यांच्या मागोमाग जाणारच. नव्या वस्तू आल्या, मोटारी, रेडिओ, इलेक्शने आली, म्हणजे त्यांच्या बरोबर नवे शब्दही यायचेच. जुने जाते, नवे येते. भाषारूपी गंगेचा प्रवाह हा असा आपला पुढेपुढे जायचाच.'

ही विचारसरणी सदोष आहे, असे मला वाटते. भाषांचे मानसशास्त्र मी पढलो आहे. जग बदलते, तशी भाषा बदलते, हे तत्त्व मला मान्य आहे. ज्ञानेश्वरांच्या वेळचे मराठी आज बोलण्यात व लिहिण्यात यावे, असा माझा आग्रह नाही. मला एवढेच म्हणायचे आहे, की ज्ञानेश्वरांच्या वेळचे जेवढे जग, तेवढ्या वस्तू नाहीशा झाल्या असतील, त्यांना व्यक्त करणारे शब्द व प्रयोग अवश्य जाऊ द्या. ते जायचेच. पण ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, शिवछत्रपती, प्रभाकर, सगनभाऊ यांच्या वेळचे जे जग आज शिल्लक आहे, आपल्याभोवती पसरले आहे, डोळयांना दिसत आहे, ते जग व्यक्त करणारी भाषा मरता कामा नये. त्या टिकाऊ जगाला व्यक्त करणारे शब्द व प्रयोग नाहीसे होता कामा नयेत. जर त्या जुन्या शब्दांऐवजी नवे समर्पक शब्द स्वाभाविकपणे भाषेच्या प्रवाहात उदयाला आले असतील, तर मग त्या शब्दांना सुद्धा मी निरोप देईन. निरोप देताना मला वाईट वाटेल, पण मी त्यांना 'आता या'





अनुक्रमणिका

म्हणेन. पण माझा दावा असा आहे, की ज्या जुन्या वस्तू आज हयात आहेत; आणि नुसत्या हयात आहेत, असे नव्हे, तर चांगल्या जोमात आहेत (का, ते पुढे पाहू) अशा वस्तूंना व्यक्त करणारे जुने समर्पक शब्द आणि वाक्प्रचार आम्ही निष्काळजीपणे गमावीत आहोत, हा आम्ही मराठी भाषेचा अक्षम्य गुन्हा करीत आहोत.

कसे, ते पाहा. जुन्या जगातील काय गेले आहे? आमचे राष्ट्रीय जीवन ज्या एका मूलभूत व्यवसायामध्ये - व भोवती - केंद्रित झाले आहे, उभारले गेले आहे, तो आमचा मूलभूत व्यवसाय, म्हणजे आमची शेती. आजही ती पूर्वीइतकीच मध्यवर्ती आहे, जीवनस्पर्शी आहे. शेती म्हटले, म्हणजे एक स्वयंपूर्ण असे जगच आपल्या डोळ्यांपुढे उभे राहते. शेती म्हणजे नानाविध स्वरूपांत नटलेली पंचमहाभूते, अनंतरूपाने भासमान होणारा, अहोरात्र आपल्याभोवती वावरणारा निसर्ग! या निसर्गाच्या अंकावरच आजही आमचे ग्रामीण जीवन जगले जात आहे. तेथे आडपडदा नाही. प्रत्यक्ष समोरासमोरचा तो सामना आहे. अनेक शतकांचे ते आलिंगन आहे!! हे निसर्गनिष्ठ जीवन जगत असता, निसर्गाचे नाना बाजूंनी, नाना प्रकारांनी मनावर व शरीरावर सतत बरेवाईट, कठीण-मृदू आघात होत असता भाषेची वाढ होत असते. निसर्गातल्या वस्तुजाताला भाषेत स्थान मिळते. ओघाने स्वभावतःच शब्द जन्माला येतात, घडले जातात.

या ग्रामीण विश्वातले काय नाहीसे झाले आहे? नाना दिशांनी आजही वारे येतात, वादळे सुटतात. त्यांना नावे होती. पूर्वीचेच ऋतू आहेत. आज पाठ्यपुस्तकांत येऊन बसल्यामुळे 'मतलई' तेवढा टिकला. दर खेड्यात पूर्वीचीच 'पांढरी' व 'काळी' आहे, खळी आहेत; पूर्वीचीच वायंगणे आहेत, खाजणे आहेत. पूर्वीसारख्याच जत्रा, उरूस भरतात, कदुऱ्या होतात, नवस फेडले जातात; पूर्वीच्याच ग्रामदेवता आहेत व त्यांचे 'उच्छाव' होतात; पूर्वीसारखेच 'हंगामे' व 'फड' भरतात. पूर्वीच्याच वनस्पती, पूर्वीचेच व्हाळ, साकव, टेकड्या, मुरमाड जमिनी; पूर्वीचीच लागवड, मशागत, कापणी, मळणी; पूर्वीचेच कारूनारू, पूर्वीचाच दर्या, गलबते, शिडे, मासळया, जाळी; जुने विश्व, जुने व्यवसाय, जुने ऋणानुबंध तसेच आहेत. त्यांचे प्रतिबिंब आमच्या ग्रामीण भाषेत पडलेले आहे. त्या प्रतिबिंबांचे प्रतिबिंब आमच्या शहरी भाषेत उत्प्रेक्षांच्या रूपाने रूढ आहे. परंतु आमची, आमच्या पाटीलबुवांची या निसर्गनिष्ठ जीवनावरची निष्ठा उडत चालली आहे. अनुभव तेच येतात, संस्कार तेच घडतात, पण ते मनाची पकड घेत नाहीत व त्यांना वाचा फुटत नाही.

दुसरा एक विचार सांगतो; फार महत्त्वाचा, जिव्हाळयाचा आहे. शब्द आणि वाक्प्रचार जन्माला येतात कसे? कारण एकच आहे. अनुभवांतून मानवी समाजाशी किंवा निसर्गाशी मुकाबले देताना गरज उत्पन्न होते आणि ती एखाद्या कवितेप्रमाणे नवे शब्द आपल्याला देते. माझी तक्रार अशी आहे, की भाषेची ही नानाविध अनुभवांतून होणारी अपरिहार्य वाढ खुंटत चालली आहे. आम्ही उत्तरोत्तर इंग्रजी शब्द किंवा त्यांच्या समानार्थी आळेवळे तयार केलेले नवे शब्द वापरतो. बहुधा उसनेच घेतो.

ते आपले नसते; आपल्या अनुभवांतून उपजलेले नसते. ही भाषिक उसनवारी आमच्या भाषेला वांझ करू लागली आहे. ही क्रिया वंद झाली पाहिजे.

आमच्या ग्रामीण जगात आज जे जीवन नांदत आहे, त्याला व्यक्त करणारी भाषा पाहिजेच. ती नाहीशी होता कामा नये. हे जीवन जगताना ज्या भावना विकसित होतात, जी मनाची घडण तयार होते, ती विशिष्ट तऱ्हांनी, लकबींनी, म्हणींनी व प्रयोगांनी व्यक्त होत असते. हे जिवंत भाषेचे लक्षण आहे. कोल्हापूर-साताऱ्याकडे आज्ञार्थी बहुवचनी 'तुम्ही जावा' असा प्रयोग करतात. वास्तविक तो आमच्या व्याकरणात हवा. पण 'तुम्ही जावा', 'तुम्ही खावा' म्हटले, म्हणजे आम्ही हसतो. तसे म्हणणारा पुढच्या खेपेला ते प्रयोग टाळतो. असेच होत गेले, तर ते प्रयोग वापरातून जातील. साताऱ्याकडे खेड्याकडील ब्राह्मण-अब्राह्मण सर्व 'पास्नं' हे शब्दयोगी अव्यय व 'त्यास्नं', 'यास्नं' हे शब्द परवापरवापर्यंत वापरीत असत. आता ते ऐकू येत नाहीत. खानदेशाकडे 'धकेल' हे एक छानदार क्रियापद रूढ आहे. आम्ही त्याला हसू लागलो म्हणजे ते जाईल व आमच्या भाषिक ऐक्यात भर पडेल–पण हानीने! मृगाच्या आरंभाला 'आगोट' हा एक चपखल शब्द आहे – होता. आता शेतकरीही तो शब्द वापरताना आढळत नाहीत. घट्ट पिठल्याला कितीजण आता 'आळण' म्हणतात? आणि 'कोरड्यास' किती सूचक समर्पक होते? 'पाटा' पेक्षा 'पिठे' काय वाईट होते? 'कोनाड्या'पेक्षा 'देवळी'? 'पायतण' जात चालले, 'वहाणा' आल्या; 'कवाड' गेले, 'दार' आले. आळण 'तवली'त किंवा 'चिकटी'त होत होते. कोठे आहेत ती भांडी? आमची घरोघर दिसणारी 'मावळण' जात चालली; 'आत्या' आली. 'मायंदळ' काय छान शब्द होता! पण तो वापरण्याची खेड्यांत सुद्धा शरम वाटू लागली. 'टकुऱ्या'ची आता शरम वाटते. किती अर्थवाही, 'रसरशीत' शब्द होता तो. संमती दाखविणारे 'बेस बेस' किती छान होते! समर्थांनी 'दासबोधा'त 'पडशाळा' हा शब्द थोडा वेळ पडण्या पहुडण्याची जागा या अर्थी वापरला. तो आमच्या वापरातून गेला व प्रसंग पडला, तेव्हा वेटिंगरूमसाठी आम्ही काही तरी नवीन धेडगुजरी संस्कृत शब्द तयार करू लागलो. तसे म्हटले, तर मराठीपेक्षा आम्हांला संस्कृत अगर इंग्रजी पत्करते. 'बायको' चालत नाही, 'आमची पत्नी' किंवा 'आमची वाइफ' आम्हांला पटते.

माझ्या दुर्दैवाने मला अनेक वर्षे खेड्यांतील मुलांचे हजारो निबंध तपासावे लागत होते. ते वाचताना ही पोरटी खेड्यात जन्मली, वाढली, निसर्गाच्या अंकावर खेळली, का ती सर्व पुण्याच्या टिळक रोडवरून व दादरच्या हिंदू कॉलनीतून धरून आणली, हे समजत नसे. निबंधाचे विषय ग्रामीण जीवनावरचे असतात. पण हे मोठ्या आढ्यतेने उपोद्घात करतात, व्याख्या करतात आणि उपसंहार करतात. त्यांच्या निबंधांत त्यांचे अनुभव, त्यांचे निरीक्षण, त्यांची भाषा, म्हणी, लकबी आढळत नाहीत. काय हे भयंकर भाषिक ऐक्य! आमचे दयाळू सरकार एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत शहरांत व खेड्यांत एकच भाषाविषयक पाठ्यपुस्तक नेमून या भाषिक ऐक्यात महत्त्वाची भर





अनुक्रमणिका

आता घालणार आहे. सारांश, 'उपसंहार', नव्हे, 'संहार'-होणार आता!

खेड्यांतील बायकांनी अद्यापि भाषा जिवंत ठेवली आहे. पण सत्तीच्या निर्जीव, निर्विकार शिक्षणाच्या चरकातून त्यांच्या मुलीसुना निघाल्या, म्हणजे त्या भाषेचाही 'उपसंहार' होईल. गावोगाव पिठाच्या गिरण्या सुरू झाल्याने आधीच आमची जात्यावरची गाणी नाहीशी होत चालली आहेत. कहाण्या, उखाणे, गवळणी, धावे, भूपाळ्या जात चालल्या आहेत. आमच्या निःसत्त्व, एकमार्गी, यांत्रिक शिक्षणपद्धतीच्या माऱ्यापुढे या बायकांची काय विशाद आहे! त्यांची भाषा जिवंत राहील, अशी आशा वाटत नाही. त्या बायका शहरातल्या त्यांच्या सुशिक्षित भगिनींच्याच पंथाला लागणार!

मी जीर्णोद्धारवादी नाही. भाषा वदलणारच. काही शब्द समर्पक व आवश्यक असून सुद्धा जाणार. काहींची जागा रिकामी राहणार, काहींची भरून निघणार, हे मला मान्य आहे. ही क्रिया स्वाभाविकपणे भाषेच्या देहधर्माप्रमाणे होत असती, तर तक्रार करण्याचे कारण नव्हते. दुःखाची गोष्ट ही आहे, की हे सर्व आमच्या औदासीन्यामुळे, बेफिकीर वृत्तीमुळे होत आहे, आणि याच्या बुडाशी आमच्या ग्रामीण जीवनाची अधोगती, करंटेपणा, स्वाभिमानशून्यता आहे. आमचे पाटीलबुवा प्रत्येक गोष्टीत शहरी संस्कृतीचे अनुकरण करू लागले आहेत आणि म्हणूनच आमच्या खेड्यांतून जिवंत मराठी नाहीसे होऊन पुस्तकी मराठी येत चालले आहे.

वास्तविक उलटे व्हायला पाहिजे होते. भाषा कशी जन्मते? कशी वाढते? आरंभी, केवळ क्रियावाचक शब्द, क्रियापदे जन्माला येतात. फेकणे, धरणे, पळणे, मारणे, खाणे, इत्यादी शब्द आधी तयार होतात. विस्तवाचा शोध लागल्यावर 'भाजणे' ची भर पडली असेल. शेतीचा शोध लागल्यावर तिच्यातील नाना व्यवसायांसंबंधी कृतिवाचक शब्द तयार होत असतील. हा भाषेचा मूळचा पाया. या क्रियावाचक शब्दांवर मुलामा चढवून आम्ही शहरी लोक त्यांच्या उत्प्रेक्षा बनवितो व वैचारिक आणि भावात्मक क्रियापदे तयार करतो. सहज ऑक्सफर्ड कोश उघडला. त्यात चार-पाच क्रियापदे आढळली. तीच देतो : apprehend, comprehend या क्रियापदांचा मूळ अर्थ 'हाताने पकडणे'; मग झाला 'समजणे, आकलन होणे.' upbraid चा मूळ अर्थ '० च्यावर हात टाकणे'; मग झाला 'निंदणे', 'टोमणा मारणे'. 'undertake', 'underhand', 'undergo', understand' या क्रियापदांतील मूळचे अर्थ सहज लक्षात येण्यासारखे आहेत.

क्रियाशील व कर्तबगार माणसे अशी भाषा बनवीत असतात व मग ऐतखाऊ विचारी माणसे या उसन्या मालावर आपला संसार थाटीत असतात. विचार आणि भावना यांचा उगम कृतींमधून, श्रमांतून – स्वतःच्या आणि दुसऱ्याच्या –असतो. तेव्हा खेड्यापाड्यांतील लोकांनी निसर्गाच्या सान्निध्यात, संघर्षात व संयोगात नाना प्रकारची कृत्ये, व्यवसाय करावे आणि आम्ही पढीक लोकांनी त्यांच्या रसरशीत ताज्या, कच्च्या,

अशोधित माला (ore) ला, शब्दसंपत्तीला आमच्या बुद्धीच्या मुशीत तावूनसुलाखून शुद्ध करावे, त्याची नाना लेणी तयार करावी व आमच्या भाषेचे व वाङ्‌मयाचे वैभव वाढवावे, अशा प्रकारचा व्यवहार व्हायला पाहिजे. इंग्रज येण्यापूर्वी आमची शहरे खेड्यांपासून इतकी स्वतंत्र झाली नव्हती. त्यांची मुळे खेड्यांतच खोल गेलेली असत व म्हणून शहरी भाषेला त्या खेड्यांतील मातीचा ताजा वास येत असे. इंग्रजी भाषेने आमच्यामध्ये येऊन आमची ती मुळे आमच्यापासून अलग केली. आम्ही त्रिशंकू बनलो. आम्ही मराठी बोललो किंवा लिहिले, तरी तो इंग्रजी वाक्यरचनेचा, लकबींचा, शब्दांचा अनुवाद असतो. वास्तविक लेखन हे भाषणाला अनुसरले पाहिजे. आमचे उलटे झाले आहे. आमचे भाषण लेखनाची नक्कल करू लागले आहे. या आमच्या भाषेला मातीचा वास कसा येणार? ती माती विलायतेतली. तो निसर्ग, ते वातावरण इंग्रजी. त्याच्या संस्काराने आमचे मराठी जिवंत, ताजे कसे होणार! आम्ही आमच्या मुळाकडेच वळले पाहिजे, त्याचा आधार घेतला पाहिजे व त्या आधारावर ताठ उभे राहिले पाहिजे.

रामायणातील काही राक्षसांची पाठ मातीस लागली, म्हणजे त्यांना दुप्पट बळ येत असे, असे म्हणतात. आम्हीही तसेच आमच्या मातीत लोळले पाहिजे. आमच्या टेकड्या पायांखाली तुडवल्या पाहिजेत; आमचे व्हाळ, आमच्या वनस्पती, पिके, गुरे, पक्षी, तारे, वादळे यांचा अनुभव घेतला पाहिजे. खेड्यांतील जनतेत मिसळले पाहिजे. त्यांच्या ताटात त्यांची भाकरी अन् कोरड्यास खाल्ले पाहिजे; त्यांच्याशी समरस झाले पाहिजे; त्यांच्याबरोबर आसवे गाळली पाहिजेत. आढ्यतेने व ताठरपणाने किंवा फसव्या कृत्रिम विनीत भावाने त्यांच्यांत न मिसळता खुल्या दिलाने आणि आपलेपणाने त्यांच्यासमोर गेले पाहिजे. म्हणजे त्यांचा आत्मविश्वास वाढेल, त्यांना त्यांच्या जीवनात स्वारस्य आढळेल. आमचा अहंगंड आम्ही टाकला, म्हणजे साहजिकच त्यांचा न्यूनगंड कमी होईल. मग आमची 'इंग्रजी' मराठी त्यांनी उचलून घेण्याऐवजी आम्ही त्यांची जिवंत मराठी पूर्वीप्रमाणे घेऊन येऊ व या जिवंत मराठीची भर घालून आमच्या भाषेला, वाङ्‌मयाला समृद्ध करू.

'नवभारत', नोव्हेंबर १९५०

(चिरस्मृत वि. द. घाटे यांच्या 'विचारविलसिते' या लेखसंग्रहातून)

○○○

# परिभाषा

— मनोहर राईलकर

गेल्या काही वर्षांत वेगवेगळया विषयांवर मराठीमध्ये पुष्कळ लिखाण होऊ लागले आहे. साहित्यशाखांकडे, मराठीमधून अभ्यास करण्याची आणि परीक्षा देण्याची सुविधा, पुणे, शिवाजी वगैरे विद्यापीठांनी दिल्यापासून मराठीमध्ये त्या शाखांची पाठ्यपुस्तके सुद्धा स्वतंत्रपणे निर्माण होऊ लागली आहेत.

**मुख्य प्रश्न.** मराठीकरणामधला सर्वांना भेडसावणारा यक्षप्रश्न म्हणजे परिभाषा. इंग्रजीमधील 'संज्ञा', विशेषेकरून विज्ञानशाखेतील, योग्य अर्थाने मराठीत उतरू शकतील, की नाही, ही शंका मराठी परिभाषा तयार करण्यामधील मोठाच अडसर होता आणि अजूनही आहे. परिभाषा तयार करण्यासाठी निरनिराळया व्यक्ती आणि सरकारी, निमसरकारी, बिनसरकारी संस्था यांनी आजवर पुष्कळच परिश्रम खर्ची घातले आहेत. साहित्यशाखेप्रमाणे शास्त्र किंवा विज्ञान शाखेकडील विषयांच्याही परिभाषा तयार झाल्या आहेत आणि त्यात थोडी थोडी भरही पडत आहे.

तरी सुद्धा शास्त्र किवा विज्ञान शाखाकडील विषयांवरील स्वतंत्र पुस्तकांची/ किंवा पाठ्यपुस्तकाची सख्या नगण्य (किवा सहजगण्य) आहे आणि मराठीकरणाला म्हणावी तेवढी गती आलेली नाही स्वातंत्र्यकालाच्या ४८ वर्षांनंतरही आपली अवस्था अशी दयनीय राहावी, हे खेदजनक आहे.

वर म्हटल्याप्रमाणे मराठीकरणातला मुख्य अडसर परिभाषा आहे. मराठीकरणाला विरोध असणाऱ्या विद्वानांचा विरोध अप्रामाणिकच आहे, असे समजण्याचे कारण नाही. पण त्यांच्या विरोधामागील कारणे कोणती? बहुधा पुढीलपैकी काही कारणे मांडली जातात :

१. मराठी भाषा पुरेशी विकसित नाही.

२. आंतरराष्ट्रीय क्षेत्रामध्ये इंग्रजीशिवाय पर्याय नाही.

३. भारतामध्येच आंतरराज्यीय सुसूत्रतेसाठी आणि सामंजस्यासाठी एकच भाषा हवी; आणि अशी भाषा फक्त इंग्रजीच.

माझ्या प्रस्तुत निबंधाचा विषय 'परिभाषा' असल्यामुळे मी वरील आणि तदानुषंगिक कारणांचा ऊहापोह तेवढ्याच दृष्टिकोनातून करणार आहे.

**पहिला मुद्दा.** भाषेचा विकास म्हणजे काय ? एखाद्या भाषेमध्ये जेवढ्या प्रमाणात विविध विषयांवर लेखन, भाषणे, परिसंवाद, चर्चा होत असतील, तेवढ्या प्रमाणात ती भाषा विकसित आहे, असे म्हणता येईल. भाषा विकसित झाल्यानंतर तिच्यात लेखनादी बाबींचा विचार करायचा, हे 'घोड्यापुढे गाडी' किंवा निदान 'आधी कोंबडे, की आधी अंडे ?' ह्या जातीचे ठरेल.

'मराठी भाषा विकसित नाही,' असे म्हणणाऱ्यांसाठी किंवा वाटणाऱ्यांसाठी Roger Gurney काय म्हणतो, हे उद्धृत करणे उद्बोधक ठरेल. (Language, Brain and Interactive Processes, Edwards Arnold, London, १९७३. पृ. २६)

'It was expected that a number of languages would be more 'primitive' than others. This is not the case. *All* languages that have been examined haved proved to be very complex and capable of carrying *all the grammatical contrasts required of them.* Large differences of *vocabulary* exist, of course, especially between contrasting societies.' (इटॅलिक्स माझा.)

यावरून भाषा विकसित आहे, की नाही, हा प्रश्न अप्रस्तुत असून परिभाषा हाच मुख्य अडथळा आहे, असे दिसते. शिक्षक, लेखक, विद्यार्थी, पालक किंवा एकूणच समाज ह्यांना ह्या बाबतीत नसलेला आत्मविश्वास किंवा अनास्था ही कदाचित मानसिक कारणे असतीलही; पण प्रमुख अडचण परिभाषेचीच आहे. शिवाय, भारतीय भाषांना असलेला संस्कृतचा आधार पाहता, आपल्या भाषाही, वेगळ्या क्षेत्रांत, पण खूपच विकसित आहेत.

ह्या संदर्भात इंग्रजीचा आग्रह धरणाऱ्यांच्या दृष्टीने इंग्रजीचेच उदाहरण उद्बोधक ठरेल. खुद्द इंग्लंडमध्येच इंग्रजीची अवस्था किती दयनीय होती, हे, W. S. Holdsworth आपल्या A History of English Law, Vol II ह्या ग्रंथात (Methuen and Co. Ltd., London, १९२३. पृ. ४८१) Sir Roger North चे म्हणणे उद्धृत करतो, त्यावरून कळून येईल :

'... the rules of English Law were scarcely expressible properly in English ... a man may be a wrangler, *but never a lawyer* without a knowledge of the authentic books of the law in their genuine (म्हणजे फ्रेंच) Language.' (इटॅलिक्स माझा.)

इंग्रजी कायद्याच्या इतिहासाकडे नंतर आपल्याला वळायचे आहे. तेव्हा इथे इतकेच पुरे.

**दुसरा मुद्दा.** आंतरराष्ट्रीय क्षेत्रात इंग्रजीशिवाय पर्याय नाही, हे मुळात एक अर्धसत्य आहे. एक तर फारच थोड्या लोकांना आंतरराष्ट्रीय क्षेत्रात प्रवेश करावा लागतो. त्यांच्या दृष्टीने हे म्हणणे काही अंशी बरोबर आहे. पण इंग्रजीबरोबर इतरही परदेशी भाषांचे महत्त्व आपल्या दृष्टीने कमी नाही. म्हणून सर्वच परदेशी भाषा सर्वांनी शिकायच्या,

असे थोडेच आहे?

आंतरराष्ट्रीय क्षेत्राशी इतर बहुतेकांचा संबंध जरी कमी येत असला किंवा मुळीच येत नसला, तरी आपल्या समाजाच्या दृष्टीने आंतरराष्ट्रीय ज्ञानग्रहणाचा मुख्य मार्ग इंग्रजीच राहणार, हे सरळ आहे. पण त्यासाठी सर्वांनीच इंग्रजीतून ज्ञानग्रहण करावे, हे पटण्यासारखे नाही. मातृभाषेतून ज्ञानग्रहण करणे सोपे असते, हा काही नवा सिद्धांत नाही. पण त्यासाठी मराठीत पुस्तके इत्यादी निर्माण होणे जरुरीचे आहे; आणि वर जो रॉजर गनींचा प्रयोगनिष्ठ अनुभव उल्लेखिला आहे, तो लक्षात घेता, परिभाषा हाच मुख्य अडसर आहे, हे स्पष्ट आहे.

**तिसरा मुद्दा**. आंतरराज्यीय सुसूत्रता. निरनिराळया राज्यांमध्ये त्यांच्या त्यांच्या भाषांमध्ये, अल्पप्रमाणामध्ये का होईना, ग्रंथनिर्मिती होत आहे. ते आवश्यक आहेच. तेथील सरकारे आणि विद्वान आपापली परिभाषाही तयार करीत आहेत. ह्या परिभाषांमध्ये एकसूत्रता राहणार नाही, हे उघड आहे. त्या त्या भाषांच्या प्रकृतीप्रमाणे आणि स्थानिक रीतीभातींप्रमाणे परिभाषांमध्ये आंतरराज्यीय एकसूत्रता असण्याचा संभव आणखीच कमी राहणार. परिणामी आंतरराज्यीय संपर्काच्या दृष्टीने भाषावार परिभाषा म्हणजे नवीनच अडथळा.

तसे कशाला? अगदी महाराष्ट्रातच निरनिराळे विद्वान किंवा निरनिराळया संस्था करीत असलेल्या परिभाषांमध्ये सुद्धा कित्येक शब्दांत एकवाक्यता नाही. एकेका शब्दाच्या योग्यतेबद्दल वादंग माजतो आणि 'एकमेव' प्रतिशब्द ठरणे दूरापास्त होऊन बसते, असा अनुभव आहे.

शिवाय ह्या परिश्रमांतून तयार झालेल्या परिभाषा-कोषांतील प्रतिशब्द वापरून मराठीत केलेले लिखाण कुणासाठी, हा प्रश्न उद्‌भवतोच. ज्यांना विषय माहीत आहे, त्यांना ह्या लिखाणाची काहीच जरुरी नाही. किंबहुना, त्या प्रतिशब्दांचा उपयोग करून तयार केलेले लिखाण त्यांना बहुधा बोजड आणि निरुपयोगी वाटते; आणि ज्यांना विषय शिकून त्याचा व्यावहारिक उपयोग करायचा आहे, त्यांना ह्या लिखाणाच्या वाचनाने होणाऱ्या उपयोगालाही मर्यादा पडतात. केवळ पदवी पदरात पाडून घेणे हाच उद्देश असेल, तर तो सफल होण्याला मदत होत असेलही; आणि बहुसंख्य विद्यार्थी परीक्षेचेच उद्दिष्ट बाळगत असल्याने जास्तीत जास्त गुण मिळवण्याकडेच त्यांचे लक्ष असणे स्वाभाविक आहे. पण ज्ञानग्रहणाचे साधन किंवा विषय समजून घेणे हा उद्देश निरर्थकच ठरतो.

समजा, त्यातूनही एखाद्या विद्यार्थ्याला खऱ्या अर्थाने विषय समजून घ्यायचा आहे, पदव्युत्तर अध्ययन, अध्यापन, संशोधन, इत्यादी उद्देश असतील, तर त्याला इंग्रजी ग्रंथांचाच आधार घ्यावा लागणार. त्यामुळे मूळ इंग्रजी परिभाषा त्याला माहीत असलीच पाहिजे.

केवळ हौस म्हणून, नित्याच्या व्यवसायाशी संबंध नसलेल्या विषयांचे वाचन करणारे आपल्या समाजात किती आहेत? कदाचित परिभाषेचा अडसर हेच त्याचे कारण असू शकेल.

**भाषामाध्यम.** अधिकाधिक लिखाण, तेही वेगवेगळया विषयांवर मराठीतून झाले पाहिजे. त्याशिवाय समाज म्हणून आपली प्रगती वेगाने होणार नाही. अगोदरच विज्ञान आणि तंत्रज्ञान ह्या विषयांचा उपयोग करण्यात आपण जगाच्या फार मागे आहोत, असे पुणे विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. वि. ग. भिडे म्हणतात. त्यांनी त्याचे एक सूत्रच केले आहे. त्यामुळे मराठीत होणाऱ्या लिखाणाकडे दृष्टी टाकली, तर परिस्थिती जास्तच निराशाजनक वाटते.

माझ्या मते, मराठीतून लिखाण वेगाने आणि आवश्यक त्या प्रमाणामध्ये न होण्यामागे मुख्य अडथळा परिभाषा हाच आहे. सरकारी धोरण, शिक्षक-प्राध्यापक यांची अनास्था, आपल्या पाल्याच्या भवितव्याबद्दल पालकांना वाटणाऱ्या खऱ्या-खोट्या चिंता, त्यामुळे त्यांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालण्याची त्यांची धडपड, हे अडसर तर आहेतच, पण ते सारे गौण आहेत. आंतरराज्यीय, आंतरराष्ट्रीय स्तरावर आपली मुले मागे पडू नयेत, ही पालकांची चिंता अस्थानी आहे, असे समजण्याचे कारण नाही. तरीही त्यांची ही चिंता योग्य परिभाषेने कमी होण्याचा संभव आहे. 'योग्य' ह्या शब्दाने मी काय सुचवू इच्छीत आहे, हे एव्हाना बहुतेकांच्या लक्षात आलेच असेल आणि त्याबद्दल स्पष्ट खुलासाही मी लवकरच करणार आहे.

प्रश्न असा आहे, की आज ज्या प्रकारची परिभाषा तयार होत आहे, तशा तऱ्हेची परिभाषा तयार करण्यामध्ये आपल्या विद्वानांनी किती शक्ती खर्ची घालावी? परदेशांत निरनिराळया ज्ञानक्षेत्रांमध्ये दररोज शेकडो पारिभाषिक शब्द तयार होत आहेत. त्यांचा योग्य अर्थ मराठीत, आणि अर्थातच सर्व भारतीय भाषांत, चपखलपणे उतरेल, असे शब्द बनवणे. तेही सर्व भारतीय भाषांना समान – तत्त्वतः शक्य आहे, असे मानले, तरी – व्यवहारतः शक्य आहे का?

**दोन टोके.** इंग्रजीशिवाय पर्याय नाही, असा आग्रह धरणारे एका टोकाला आणि आपल्या भाषण-लेखनात एकही परकीय शब्द येऊ देणार नाही, असा आग्रह धरणारे दुसऱ्या टोकाला. ह्या ओढाओढीत आपल्या भाषेची आणि समाजाची प्रगती मंदावते किंबहुना बंदच पडते, हे लक्षात घेतले पाहिजे. एकही परकीय शब्द येऊ न देण्याचा आग्रह कसा असाध्य आहे, हे ह्याच लेखातून मी दाखवून देणार आहे.

१९४७ साली स्वातंत्र्य मिळाल्यावर लागलीच काही धोरण आखून त्याची कसोशीने अंमलबजावणी केली असती, तर आज आपल्याला मोठा वाटणारा परिभाषेचा आणि माध्यमाचा प्रश्न त्याच वेळेपासून सुटण्यास आरंभ झाला असता; आणि कदाचित, आज त्याचे अस्तित्व सुद्धा राहिले नसते. पण आता ते अशक्य आहे.





अनुक्रमणिका

डॉ. राधाकृष्णन शिक्षण आयोग, डॉ. बा. गं. खेर भाषा आयोग, भावनिक एकात्मता आयोग, ह्या सर्वांनी, मातृभाषेचा माध्यम म्हणून उपयोग करणे जरुरीचे आहे, हे आग्रहाने मांडले आहे. भारताप्रमाणे रशियातही (त्या वेळच्या) भाषांची संख्या पुष्कळ आहे. रशियाने हा प्रश्न कसा सोडवला, हे खेर आयोगाच्या वृत्तांतावरून समजून येईल.

डॉ. अ. रा. कामत यांनी १९६३ साली Wastage in College Education ह्या नावाने केलेल्या पाहणीतूनही मातृभाषेतून अध्ययन केलेल्या आणि परीक्षा दिलेल्या विद्यार्थ्यांचे यश तुलनेने अधिक आहे, हे दाखवून दिले आहे. (Gokhale Institute of Politics and Education, पुणे ४.)

मुंबई विद्यापीठाने १९१६ साली प्रथमच इतिहास हा विषय आपापल्या मातृभाषांतून शिकण्यास विद्यार्थ्यांना प्रयोग म्हणून अनुमती दिली. १९१९ मध्ये डॉ. म. रा. परांजपे यांची एकसदस्य समिती नेमून पाहणी करवली. समितीच्या वृत्तांतावरूनही अध्ययनात असलेले मातृभाषेचे महत्त्व कळून येईल.

थोडक्यात, शिक्षणात म्हणजेच ज्ञानग्रहणात मातृभाषेला पर्याय नाही, ह्याबद्दल दुमत असू नये. निदान तज्ज्ञांमध्ये तरी नाही. प्रस्तुत लेखाचा उद्देश भाषा-माध्यम हा नसल्याने ह्यावरील उदाहरणांचा तपशिलाने विचार करण्याचे माझे उद्दिष्ट नाही.

परंतु इंग्रजी भाषेचे महत्त्व नेमके कशात आहे, याचा विसर पडल्याने, शिक्षणशास्त्रातल्या, 'मातृभाषा हेच ज्ञानग्रहणाचे सर्वोत्कृष्ट माध्यम असते,' ह्या मूलभूत सिद्धांताकडे आपण दुर्लक्ष करून आपलीच हानी करून घेत आहोत, असे मला ठामपणाने वाटते.

**जेत्यांची भाषा.** भाषा म्हणून इंग्रजी भाषा परकीय आहेच. शिवाय, भारतीय भाषांच्या आणि इंग्रजीच्या वाक्यरचनांतच मोठा फरक आहे आणि लिप्यांच्या व्यवस्थेतही फार मूलभूत स्वरूपाचा फरक आहे, हे निर्विवाद; पण म्हणून इंग्रजी भाषेतील शब्द घेण्यास आपल्याला का अडचण वाटावी?

असलीच अडचण, तर ती भावनिक आहे. एके काळी इंग्रज हे जेते आणि आपण जित होतो. जितांच्या मनात जेत्यांविषयी चीड, राग, आकस असणे नैसर्गिक आहे. पण आता इतक्या वर्षांच्या स्वातंत्र्यानंतर आपल्याला ह्या भावनेच्या पलीकडे जाण्यास काय हरकत असावी? इंग्रजी शब्द परकीय म्हणून त्यांची हकालपट्टी करण्याचा आणि प्रत्येक शब्दाला मराठी प्रतिशब्द शोधण्याचा आग्रह कशाकरता? सोयिस्कर म्हणून इंग्रजी पद्धतीचे कपडे आपण वापरतो. इंग्रजी पद्धतीची भोजनव्यवस्था आजकाल बहुतेक सर्वच शिक्षित कुटुंबांत आढळते. रेल्वे, टेलिफोन, टीव्ही, इत्यादींचा आपल्याला उपयोग होतोच. अशी कित्येक उदाहरणे सापडतील.

तसे कशाला? महापौर, नगरसेवक, स्थायी समिती, रुग्ण, रुग्णालय, चिकित्सा, उपचार, शस्त्रक्रिया, इत्यादी सुंदर व चपखल शब्द उपलब्ध असूनही आपण त्यांचा

उपयोग न करता, मेयर, कॉर्पोरेटर (किंवा मेंबर), स्टँडिंग कमिटी....,पेशन्ट, हॉस्पिटल, डायग्नॉसिस, ट्रीटमेंट, ऑपरेशन... हेच शब्द वापरतो. इतकेच नव्हे, तर मराठी शब्द वापरणाऱ्याची टिंगलही क्वचित होते आणि अशिक्षित किंवा कमी शिकलेल्या माणसांना तर इंग्रजी शब्द वापरल्याशिवाय आपल्या बोलण्याला प्रतिष्ठाच आल्यासारखे वाटत नाही.

टॅक्सी, रिक्षा, बस, सायकल, स्कूटर, फोन, रेडिओ, टीव्ही, स्टेशन, प्लॅटफॉर्म, रिझर्वेशन, तिकीट, ड्रायव्हर, कंडक्टर, सीट, नंबर, सिनेमा, शो, बँक, पासबुक, डिपॉझिट,.... किती तरी शब्द मराठीत आले आहेत. त्यांच्याकरता ॲ आणि ऑ हे स्वर सुद्धा आपण मराठीमध्ये नव्याने स्वीकारले आहेत.

शिवाय आपले शब्द म्हणजे काय? नीट (neat), हिडीस (hideous), सटरफटर (subterfuge), टाच (attachment), टोल (toll) हे शब्द (आता) आपलेच आहेत ना? आपल्याला पत्ताही लागणार नाही, इतके शब्द आपल्या भाषेत शिरून 'आपले' होऊन गेले आहेत. आधीच्या परिच्छेदात दिलेली यादी पाहता, अजून सुद्धा ही प्रक्रिया चालू आहे आणि कोणाला आवडो न आवडो, ती चालू राहणारच आहे. सध्या, हे शब्द इंग्रजी असल्याचे आपल्याला माहीत तरी आहे. कालांतराने वरच्या शब्दांप्रमाणे तेही आपण ओळखू शकणार नाही.

**फायदे.** अध्यात्म, योग, समाधी, वगैरे संकल्पना आपल्या भूमीत निर्माण झाल्या. त्या इंग्रजी आणि इतर भाषांमध्ये गेल्या. मात्र, त्यांच्यासाठी नवीन शब्द तयार करण्याच्या फंदात पडण्याऐवजी मूळ संस्कृत शब्दांचाच वापर करणे त्यांना अवघड गेले नाही. मग आपणही तसे करायला काय हरकत असावी? आपणही, उचलून आणावयाची संकल्पना तिच्या नावासहित उचलायला काय हरकत असावी? फार तर आपल्या भाषेच्या प्रकृतीला अनुसरून त्या शब्दांची मोडणी करून घ्यावी. इंग्रजीने हे केले आहे. याबद्दल पुढे खुलासा केला आहे.

असे जर आपण करायचे ठरवले, तर पुढे दिल्याप्रमाणे अनेक दृष्टींनी आपल्याला फायद्याचे ठरेल.

१. नवीन शब्द घडवण्यात आपली शक्ती वाया जाणार नाही.

२. सर्व भारतीय भाषांना एकच प्रतिशब्द मिळाल्यामुळे आंतरराज्यीय संपर्कामधील एक मोठी अडचण दूर होईल.

३. इंग्रजीतून शिकलेल्या शिक्षकांना आपला विषय मराठीतून लिहिणे–बोलणे सोपे जाईल.

४. मराठीमध्ये पुस्तके, लेख, इ. लिहिण्याच्या कामाला गती येईल. म्हणजेच भाषा अधिकाधिक विकसित होईल.

५. मराठीतून शिकलेल्या विद्यार्थ्यांना नंतर इंग्रजी पुस्तके वाचण्यास फारसे

कठीण जाणार नाही. आंतरराष्ट्रीय संपर्काची दारे कुणालाच बंद होणार नाहीत.

६. एकूणच सर्व समाजाला ज्ञानग्रहणाची द्वारे खुली होतील.

एखाद्याला फावल्या वेळात हौस म्हणून वेगळ्या विषयांचे वाचन-अभ्यास करायचा असेल, तर मराठीत आज पुस्तके उपलब्ध नाहीत. ती उपलब्ध होतील. आज असे कोणी फारसे करीत नसेल, तर त्यांना उत्तेजनही मिळेल.

गाल्वाने (Evarist Galois, एक फ्रेंच गणितज्ञ) वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी बीजगणितावर मूलग्राही संशोधन केले. अनेक वर्षे कूट म्हणून अडकून पडलेल्या, भूमितीमधील काही समस्यांची उकल करणे त्याच्या ह्या संशोधनामुळेच शक्य झाले.

'पाचव्या डिग्रीची इक्वेशन, केवळ रॅडिकल्सच्या साह्याने सोडवता येत नाही,' असे आबेलने (Niels Abel, नॉर्वेमधील गणितज्ज्ञ) पंधराव्या वर्षीच सिद्ध केले, हे जेव्हा माझ्या वाचनात आले, तेव्हा प्रथम मी स्तंभित झाले, हे खरे. पण मनोमन खंतही वाटली. कुणाच्याही मदतीशिवाय वाचता येतील, अशी पुस्तके त्यांना अगदी लहानपणीही त्यांच्या भाषेत उपलब्ध होऊ शकली, हे त्यांचे भाग्यच. माझ्या समाजात अशी प्रज्ञावंत मुले नाहीत का? नक्कीच आहेत. पण त्यांचे दुर्दैव असे, की त्यांना बालवयातही समजतील, अशी विज्ञान विषयावरील पुस्तके किती आहेत? सुप्रसिद्ध भाषापंडित डॉ. रघुवीरांनी स. प. महाविद्यालयात झालेल्या एका भाषणात अशी माहिती सांगितली,

'सर्वसाधारणपणे वयाच्या बारा वर्षांपर्यंतच्या मुलाला स्वतःच्या भाषेतील सुमारे तीस हजार शब्द माहीत होतात आणि त्यामुळे तो आपल्या भाषेतील कोणत्याही विषयावरील पुस्तक 'वाचू' शकतो. दुर्दैवाने, त्याने जमवलेली ही शब्दसंपत्ती पुढील ज्ञानग्रहणाकरता त्याला उपयोगी पडू शकत नाही, कारण सर्वच महत्त्वाचे लिखाण इंग्रजीतून.'

अर्थवाही, चपखल असे शब्द आधीच आपल्या भाषेत उपलब्ध असल्यास, वापरूच नयेत, असे मी सुचवू इच्छीत नाही. पण नवीन शब्द तयार करण्यात वेळ घालवू नये. तीच शक्ती पुस्तके लिहिण्याच्या कामाला लावावी, असे मला वाटते. प्रत्यही सर्वच ज्ञानशाखांची प्रगती एवढ्या वेगाने होत आहे आणि इतक्या शब्दांची भर पडत आहे, की त्या वेगाने प्रतिशब्द तयार करणे आणि ते मान्य होऊन त्यांनुसार पुस्तके लिहिली जाणे, हे व्यवहारतः अशक्य आहे, एवढेच पुनरुक्तीचा दोष पत्करून मला म्हणायचे आहे. शिवाय आंतरराज्यीय एकसूत्रतेचा आणि आंतरराष्ट्रीय संधीचा प्रश्न आहेच.

**इंग्रजीची स्वतःच्या मायभूमीतील अवस्था.** ज्या इंग्रजीचा आपल्याकडील काही जण एवढा दुस्वास करतात आणि काही जण उदो उदो करतात, त्या इंग्रजीची अवस्था आपल्या मायभूमीतच किती दयनीय होती, हे ह्या संदर्भात पाहणे अप्रस्तुत होणार नाही.

उलट, उद्‌बोधक आणि मार्गदर्शकच होईल. 'परकी' भाषेतील शब्द घेण्याला त्यांनाही कमीपणा वाटत होता. कारण त्यांच्याकरता ती जेत्यांची भाषा होती. फ्रान्समधील नॉर्मन घराण्याचे इंग्लंडवर आधिपत्य होते. परिणामी इंग्लंडच्या राज्यकारभाराची आणि कोर्टाची भाषा फ्रेंच होती. (त्या आधी लॅटिन होती.) पण लवकरच त्या गंडातून ते बाहेर पडले आणि मिळतील तेथून शब्द स्वीकारून त्यांनी आपली भाषा समृद्ध केली. एवढी, की आज ती 'आंतरराष्ट्रीय' महत्त्वाची भाषा आहे, असे आपण म्हणू लागलो आणि इंग्रजीशिवाय पर्याय नाही, असे आपल्याला वाटू लागले. अर्थात, आज अनेक देशांतील विद्यापीठांत इंग्रजी शिकणे जरुरीचे (सक्ती नव्हे) मानले जात आहे, हे खरे आहे; आणि आपल्याही दृष्टीने ती महत्त्वाची गोष्ट आहे, हे मान्य केले पाहिजे.

दुसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दीत १७३३ मध्ये कायदा होईपर्यंत इंग्लंडचा राज्यकारभार आणि कोर्टाचे काम फ्रेंचमध्ये होत असे. सर्व व्यवहार इंग्रजीतच व्हायला हवेत, असा कायदा १३६२ मध्ये झाला होता. (Pollock and Maitland : The History of English Law, Vol. I, १९६८ पृ. ८४-८५) मात्र विनोद असा, की हा खुद्द कायदा फ्रेंच भाषेमध्येच होता!

१७३३ मधल्या ह्या कायद्यान्वये कोर्टात आणि संसदेत केवळ इंग्रजी भाषेचाच वापर करण्याची सक्ती करण्यात आली होती आणि दुसऱ्या कोणत्याही भाषेत बोलण्याचा प्रयत्न करणे हा गुन्हा ठरवण्यात आला होता. इतकेच नव्हे, तर अशा गुन्ह्याला ५० पौंड दंडही करण्यात येत असे.

विशेष म्हणजे, ज्या वेळी Sir G. Savile ने ह्या संबंधातील बिल मांडले, त्या वेळी इंग्लंडच्या दोन्ही सभागृहांनी आणि वकील मंडळींनी प्रखर विरोध केला. 'इंग्रज कायद्याची आता पुरती वाट लागेल आणि वकिलांची संख्या दुपटीने वाढेल,' अशी मते ते मांडू लागले. Sir Roger North चे म्हणणे वर मांडलेच आहे. त्यामुळे प्रत्यक्षात ह्या कायद्याचा लाभ मिळू लागण्याकरता आणखी सुमारे शंभर वर्षांचा काळ जावा लागला. (C. G. Robertson : Select Statutes, Cases and Documents, Methuen & Co. Ltd., London, १९२३ पृ. २०९-२१०) आणि खऱ्या अर्थाने हा प्रश्न सुटण्यास आणखी चार-पाच शतके उलटावी लागली.

प्रस्तुत निबंधाच्या दृष्टीने महत्त्वाचा मुद्दा म्हणजे, हा कायदा करणाऱ्यांनाही फ्रेंच भाषेचे महत्त्व अमान्य होते, असे नाही. Pollock and Maitland (Vol I) म्हणतात,

'...but an English or American lawyer, who attempted this puritanical feat, would find doomed to silence...' (पृ. ८०)

भाषाशुद्धीचा आग्रह धरणाऱ्यांना हे अगदी योग्य उत्तर आहे.

Holdsworth सुद्धा (पृ. ४८१ वर) असेच म्हणतो,

'...But it could never hitherto be wholly, abolished as well as reason

of certain terms which pleaders do more properly express in French than in English.'

इंग्लंडवर फ्रेंच घराण्याचे राज्य येण्यापूर्वीचे असे काही शब्द इंग्लिश कायद्यामध्ये आहेतही. पण कायद्याचे कोणतेही व्यवहार फ्रेंच शब्द वापरल्याशिवाय आपल्याला करता येणार नाहीत, हे इंग्रजांनी ओळखले होते. इतकेच नव्हे, तर कोर्टाचे (!) सर्व व्यवहार इंग्रजीमधूनच होणे जरूर आहे, असा कायदा एकीकडे करीत असताना **महत्त्वाचा प्रत्येक शब्द फ्रेंचच असावा,** हा आग्रह सुद्धा त्यांनी बाळगला होता, हे पुढील परिच्छेदावरून कळून येईल.

**इंग्रजीवरील फ्रेंचचा प्रभाव** Pollock and Maitland यांनी पृ. ८० वर दिलेली पुढील यादी पाहावी. ह्या यादीतील प्रत्येक शब्द एक तर मूळ फ्रेंच आहे, किंवा एखाद्या फ्रेंच शब्दावरून बनवलेला आहे.

Contract, agreement, obligation, debt, bill, note, master, servant, partner, guarantee, tresspass, assault, damage, crime, treason, felony, robbery, burglary, property, possession, pledge, lien, payment, money, grant, purchase, marriage, guardian, infant, ward ...

तसे कशाला ? फ्रेंच शब्द वापरल्याशिवाय इंग्रज माणसाला 'कोर्टाची पायरी'सुद्धा चढता येणार नाही. कारण, court, judge, justice, juror, counsel, attorney, clerk, party, plaintiff, defendant, action, suit, claim, demand, declaration, pleadings, evidence, verdict, conviction, sentence, appeal, pardon, execution... इत्यादी फ्रेंच शब्द वापरल्याशिवाय चालणारच नाही.

कोर्टाप्रमाणे इतर व्यवहारातही फ्रेंच भाषेचा प्रभाव आहे. Parler म्हणजे बोलणे. ह्यावरून parole, parliament; Porter ह्या धातूपासून port, portable, porter; Beautiful ह्या शब्दातील beau (सुंदर), bonafide मधील bon (चांगले) हे शब्द फ्रेंच आहेत. Chamber (chambre), vallet, ambassador, correspondent, minister, prime, assembly, bureau, assistant, aide, security, ... इत्यादी, राज्यव्यवहाराशी संबंधित शब्दही फ्रेंच शब्दांवरून बदल होऊन किंवा तसेच आले आहेत. इंग्लंडमध्ये आणि इंग्रजीतून पाठवल्या जाणाऱ्या आपल्याही, निमंत्रणपत्रिकांत शेवटी लिहिले जाणारे संक्षिप्त इंग्रजी वाक्य R.S.V.P. हे शुद्ध फ्रेंच आहे. (Repondez s'il vous plait. आपल्याला जर आनंद होणार असेल, तर उत्तर द्या!) Buffet, bouquet, restaurant, cafe', madam(e) असे उच्चभ्रू समाजात रूढ झालेले कित्येक शब्द फ्रेंच आहेत, मराठीत जसे अरबी-फारशी-तुर्की कित्येक शब्द बेमालूम (?) मिसळले आहेत, तसे इंग्रजीत कित्येक फ्रेंच शब्द मिसळले आहेत.

**इतर भाषांचा प्रभाव.** इंग्लिशने इतरही भाषांतून उचलेगिरी केली आहे. खरे तर, एखादी ज्ञानशाखा जेथे विकसित होते, तेथे तयार होणारे शब्दही त्यांतील

संकल्पनेबरोबरच जन्म घेतात. परिणामी ते अधिक नैसर्गिक असतात. मग दुसऱ्या भाषेत गेल्यावर त्या शब्दांना चपखल असे प्रतिशब्द मिळतीलच किंवा बनवता येतीलच, असे नाही. बनवले, तर ते बोजड, क्लिष्ट आणि अर्थशून्य होण्याचाच संभव जास्त. असे कित्येक भाषांतरित पण चुकीचे शब्द आपल्याकडेही मान्यता पावलेले आहेत. त्यापेक्षा सरळ सरळ उचलेगिरी करणे किंवा आपल्या भाषेच्या प्रकृतीप्रमाणे ते शब्द वाकवून घेणे हाच राजमान्य मार्ग आहे. इंग्लिशने हे सर्रास केले आणि आपली शब्दसंपत्ती अमाप वाढवली.

आधुनिक मानसशास्त्र जर्मनीत विकसित झाले. पण जर्मनीकडून मानसशास्त्र घेताना सगळेच शब्द स्वतःचे घडवण्याऐवजी इंग्रजीने शब्दही घेतले. Gestalt, schizophrenia, oedipus (complex) आणि दैनंदिन व्यवहारातील brief (पत्र), gross (मोठा), school (मूळ schule. आपल्या 'कुल'शी नाते सांगतो का?)... इतरही अनेक युरोपीय भाषांतून इंग्रजीने अशी सर्रास उचल करून आपला पसारा वाढवला आहे. त्यांना त्यात कधी कमीपणा वाटला आहे, असे दिसत नाही. गणित, किंवा अन्य विद्याशाखांतील कित्येक शब्द इंग्रजीने युरोपीय भाषांतून घेतले आहेत. Solution, fraction, centre, degree, point, plane (मूळ लॅटिन), equation (लॅटिन) हे शब्द फ्रेंच किंवा तद्धित आहेत.

**हे कोठले शब्द?** इंग्रजीच्या दृष्टीने, युरोपीय भाषांतील शब्द घेणे स्वाभाविक असेल. पण वाचकांना मी एक सौम्यसा धक्का देऊ इच्छितो. पुढील यादीतील शब्द वाचावेत.

अवतार, अहिंसा, निर्वाण, आत्मन, समाधी, आरती, पूजा, ब्रह्म, आनंद, योग, सत्त्व, रजस, तमस, मुक्ती, वेदान्त, उपनयन, वाहिनी, तीर्थ, यात्रा, स्व, स्वामी, स्वदेशी, श्राद्ध, संन्यास, ओम्, मंत्र, ऋषी, नेता, निधी, सैनिक, नायिका, मोगरा, गुलमोहर, वडा, इडली, सांबार, टकली(ळी), फटफटी (त्याच अर्थाने) .....

एक-दोन नव्हेत, अशा जवळजवळ अठराशे शब्दांचा एक कोशच ऑक्सफर्डने प्रसिद्ध (Little Oxford Dictionary) केला आहे. कोणत्या भाषेतले शब्द आहेत, असे वाटते? भारतीय भाषांतून इंग्रजीने घेतलेले हे शब्द आहेत. English words of Indian origin असे वर्णन ते निर्धास्तपणे करतात! म्हणजे ह्या शब्दांचे मूळ भारतीय आहे, हे ते प्रांजलपणे मान्य करतात. पण त्याच दमात, हे शब्द इंग्रजी आहेत, असेही म्हणायची त्यांची तयारी आहे!

भारतात जिचा शोध लागला, ती दशमान पद्धत आणि तिच्याबरोबर संख्याचिन्हेही आज जगभर पोहोचली आहेत. 'हिंदू संख्याचिन्हे' म्हणून त्यांचा उल्लेख करण्यात आणि उपयोग करण्यात कुणाला काही कमीपणा वाटत नाही. ह्या संदर्भात, तथाकथित इंग्रजी अंकांना असलेल्या आक्षेपाचा समाचार घेणे मला जरुरीचे वाटते. हे इंग्रजी अंकही मूळचे भारतीयच आहेत. इ. स. पूर्व सुमारे २०० वर्षांपूर्वीचा एक

शिलालेख नाणे घाटात सापडला. त्यावर असलेल्या अंकांकडे नजर टाकली, तर आपण थक्क होतो. आज ज्यांना आपण इंग्रजी अंक म्हणतो, तसेच पुष्कळसे त्यावरील अंक आहेत. (Alfred Hooper Makers of Mathematics. १९४८, Random House, New York पृ. २२.)

**परकीय शब्द.** तथाकथित 'परकीय' शब्दाबद्दलचा आपला भ्रम दूर करण्याला उपयोग होईल, म्हणून एक उदाहरण देतो. वर ओझरता उल्लेख केलेल्या एका मुद्द्याचा विचार करू. इतिहासकालातील मोंगलांच्या वर्चस्वामुळे असेल, किंवा मध्यपूर्वेतील देशांबरोबरच्या व्यापारामुळे असेल, पण मराठीत खूपच अरबी-फारसी शब्दांची 'घुसखोरी' झाली आहे. इतकी, की आज आपल्याला सांगितले, तर धक्का बसावा, असे शब्द थेट आपल्या घराघरांत, स्वयंपाकघरापर्यंत आणि अगदी शेजघरापर्यंतही पोहोचले आहेत. चमचा, न्याहरी, नाश्ता, चपाती, जिलबी, नानकटाई, बदाम, पिस्ता, बेदाणा, अगदी 'मेवा'सुद्धा,..., चाकू, जमीन, जुमला, बंगला, फरशी, लादी, गिलावा, तक्तपोशी, पत्रा, बाग, बगीचा, कुलूप, किल्ली, विहीर,..., गादी, पलंग, पलंगपोस (पोस – संरक्षक आवरण, उदा., पायपोस), अभ्रा, पडदा, कशिदा,..., पायजमा, जामा-निमा, नखरा, मेंदी, खस, हिना, अत्तर, गुलाबदाणी, मौजमजा,...,पसंती, वरात, रुखवत, सनई, ताशा, बस्ता,...,आलिशान, छान, आरास, सजावट,...,कंदील, मेणबत्ती, ...,आजार, मलूल, जखम, तब्येत, दवाखाना,..., मोर्चा, लढा, हल्ला, एल्गार, ढाल, तलवार, किल्ला, बुरूज, लगाम, आयाळ, खोगीर, स्वार, चिलखत, सरदार, रसद, कारस्थान,...,दुकान, गल्ला, माल, नमुना, सौदा, नफा-फायदा, तोटा-नुकसान, विमा, कायदा, गुन्हा, कैद,...,जोर, कुस्ती, पेच, मेहनत, ताकद, पैलवान, हौदा, फरी-गदगा,...,आवाज, गोंगाट, गुणगुणणे, सरकार, इलाका, तालुका, जिल्हा, जमीनजुमला, दबदबा, गल्लीकुच्ची, फरारी, फिर्याद, सक्त मजुरी, रोजगार, हमाल, बिगारी, हमी, अर्ज, राजिनामा, कागद, नोकर, चाकर, बदली, मंजुरी, दिरंगाई,...,औजार, ऐरण, रंधा, कसाई, कासार, कल्हई, तंबाकू, चिलीम, साज, तबला, पोतदार, बक्षी, तांडेल, सरखेल, सरलष्कर, पोतनीस, फडणीस, असे शेकडो शब्द आपल्या जीवनाचा अविभाज्य भाग बनून गेले आहेत. आपण ते पचवले आहेत. ते काढून त्यांच्या जागी 'आपले' शब्द कसे आणणार? आणि आणले, तरी ते कोण वापरणार? आणि जर ते कुणीच वापरले नाहीत, तर त्यांचा काय उपयोग? या उलट, आपल्याकडूनही त्या भाषांत शब्द किंवा काही अवयव गेले आहेत. –मंत (मूळ संस्कृत मत्). ह्यातील मंत वरूनच –मंद झाला, म्हणून तर अक्लमंद, एहसानमंद वगैरे शब्द बनले असणार. हस्तचा दस्त, सव्यचा चप्प आणि त्यावरून परत चपणा (डावखुरा), इत्यादी अनेक शब्द सापडतील.

**शब्दपाचन.** माझे म्हणणे असे, की शब्द आपले करण्याची किंवा परकीय शब्द पचवण्याची ही प्रक्रिया आपण **बुद्धिपुरस्सर** चालू ठेवावी आणि आपल्या शब्दसंपत्तीमध्ये

भर घालावी. विशेषतः **विज्ञान - विषयांकरता** ही प्रक्रिया जोमाने चालू करावी. दैनंदिन जीवनात सुद्धा इंग्रजी शब्दांकरता बनवलेले चांगले आणि सुटसुटीत प्रतिशब्द आपण वापरीतच नाही. वर एक यादी दिलीच आहे. 'पत्नी' न म्हणता Wife म्हणण्यात अभिमान वाटतो. आपलीच नृत्यकला आपल्याच शिक्षिका आणि आपल्याच मुलींना शिकवताना पदन्यास किंवा पावले म्हणण्याऐवजी स्टेप्स म्हणतात. विलंबित, मध्यम, द्रुत लय असे न म्हणता फर्स्ट स्पीड, सेकंड स्पीड आणि थर्ड स्पीड म्हणतात, तेव्हा हसू येते. लग्नाच्या निमंत्रणपत्रिकांऐवजी वेडिंग सेरेमनीचे इन्व्हिटेशन येते आणि तेही पानसुपारीऐवजी रिसेप्शनकरता. 'आहेर आणू नये' ह्या वाक्याऐवजी 'नो प्रेझेंट्स, प्लीज' असे वाचावे लागते. आपल्या आसपास अशी कित्येक तऱ्हेची कित्येक उदाहरणे पदोपदी आढळतील. ह्या साऱ्याचे आपल्याला काहीच वाटत नाही.

मग ज्ञानक्षेत्रांमध्ये निरनिराळ्या प्रगत विषयांवर लेखन करताना, भाषणे देताना, मूळ इंग्रजी शब्द न वापरता, कृत्रिम असलेले क्लिष्ट, बोजड, आपोआप अर्थ स्पष्ट न होणारे शब्द वापरण्याचा सोवळेपणा का करावा? ज्या संकल्पना आपल्या भूमीत निर्माणच झाल्या नाहीत आणि ज्या आपण सरळ सरळ उचलून आणल्या आहेत, त्यांच्यासाठी सुटसुटीत, पूर्ण अर्थ स्पष्ट करणारे, चपखल शब्द सापडणे किंवा तयार करणे अशक्य आहे – निदान अवघड आहे. (योग्य प्रतिशब्दाकरता बारा कसोट्या आहेत, असे ऐकतो.)

**मिश्र भाषा.** कोणतीही भाषा कधीही 'शुद्ध' नसतेच. संकृतिसंगमाप्रमाणे भाषासंगमही चालूच असतो. जोवर आपल्या भाषेच्या मूळ प्रकृतीवर अत्याचार होत नाहीत, तोवर इतर भाषांतले आवश्यक शब्द उचलून आपल्या भाषेच्या प्रकृतीला अनुसरून ते वाकवून निर्धास्तपणे स्वीकारावेत आणि भाषासंगमाच्या प्रक्रियेला हातभार लावावा. मी 'मिश्र भाषा' असे उपशीर्षक दिले आहे. पण कालांतराने तसे वाटणारही नाही, इतके ते शब्द आपल्यात मिसळून जातील. वर दिलेल्या अरबी-फारसी शब्दांप्रमाणे किंवा आज घटकेला असलेल्या कित्येक इंग्रजी शब्दांप्रमाणे.

गणित, जीवशास्त्र, रसायनशास्त्र, अर्थशास्त्र वगैरे विषयांवरील मराठीतून लेख, पुस्तके, इ. मी वाचले आहेत. लेखकाला काय म्हणायचे आहे, ते कित्येकदा मला कळतच नसे. असे वाटले, की कशाकरता हा अनाठायी खटाटोप चालू आहे? कोणासाठी? लेखकांच्या प्रांजलपणाबद्दल किंवा ज्ञानाबद्दलही मला शंका नाही. पण मला वाटते, त्यांच्या शक्तीचा आणि बुद्धिमत्तेचा हा अपव्यय आहे.

एम्. एस्सी. च्या वर्गामध्ये सुद्धा विद्यार्थी मला मिश्र भाषेतच शंका विचारीत. उदा. ''सर, फंक्शन कंटिन्युअस आहे, हे दाखवण्यासाठी ही कंडिशन इक्विव्हॅलंट आहे, असं तुम्ही म्हणालात. म्हणजे, एक्स्नॉटपाशी कॉन्व्हर्ज होणाऱ्या एक्स-एन ह्या प्रत्येक सीक्वेन्सकरता...'' तेव्हा त्यांचा हेतू लवकर साध्य होत असे. मीही अशा तऱ्हेने

प्रश्न विचारण्याला उत्तेजन देत असे. त्यांनी वर्गात प्रश्न विचारले पाहिजेत, असा माझा आग्रह असे. विद्यार्थ्यांना प्रश्न विचारणे आणि त्यातून त्यांना गणित कळणे हे माझ्या दृष्टीने महत्त्वाचे होते. इंग्रजीत वाक्यरचना करणे कठीण जाते, पण गणित कळते. मग त्यांनी प्रश्न असे विचारणे हे क्रमप्राप्त आहे. हा अनुभव मला एम्. एस्सी. च्या व्याख्यानांच्या वेळी जसा येई, तसा संशोधन स्तरावरील चर्चेतही येई. आम्ही अशीच चर्चा करीत असू आणि आजही अशीच चर्चा होत असणार. ती आपण थांबवूच शकत नाही.

पण थांबवायचीच कशाला?

शिक्षित मध्यम वर्गाकडेही आता, स्कूटरसारखी वाहने आहेत. त्यांच्या संदर्भात बोलताना मराठी शब्द वापरायचे ठरवले, तर! स्पोक, व्हॉल्व्ह, ट्यूब, टायर, हँडल, बेअरिंग्ज, हब, सीट, ब्रेक(क्स), नट, स्क्रू (ज), प्लग, डायनामो, इग्निशन कॉईल, सिलिंडर, रिंग्ज (रिंगा?), कार्बुरेटर, हेडलँप, फ्लॅश-डिपर, स्प्रिंग्ज (स्प्रिंगा?), पेट्रोल, ऑईल, क्लच, गियर,... किती शब्द? यांच्याकरता आपण कसे शब्द करणार? ते कोण वापरणार? कोणाला कळणार? आणि अगदी हट्टाने कोणी वापरलेच, तर? कदाचित, मेकॅनिक(?) म्हणेल, 'साहेब, तुमचं काम नको. पण जरा सरळ(?) मराठीत बोला ना.'

मग कशाकरता हा हट्ट? श्री. वि. ल. पाटील यांनी स्कूटर-मोटर दुरुस्तीवर इतकी सुंदर पुस्तके लिहिली आहेत. मराठी प्रतिशब्द वापरण्याचा हट्ट त्यांनी धरला नाही. सर्रास मूळचे शब्द वापरले आहेत. जिज्ञासूंनी पुस्तके मुळातूनच पाहावीत. मराठीच येते, इंग्रजी चांगले येत नाही, आणि बुद्धी आहे, अशा यंत्रज्ञांना अशा मराठीत लिहिलेली पुस्तके उपलब्ध झाली, तर ते आपले ज्ञान वाढवू शकतील, की नाही? अद्ययावत करू शकतील, की नाही? कदाचित आपापल्या क्षेत्रात काही नवीन संशोधन, नवीन निर्मिती करू शकतील. त्यांच्या सर्जनशीलतेला वाव मिळेल. कुणी सांगावं, आपण सुद्धा जगाला गाल्वा, आबेल यांच्यासारखे दिव्य गणिती पुरवू शकू. उच्च गणितावर अशा भाषेत पुस्तके लिहिली, तर गणिताचा अभ्यास करण्याची अपुरी आकांक्षा पूर्ण करण्याची संधी आपल्यातल्या कित्येकांना उपलब्ध होईल, की नाही? आपण त्यांना का वंचित ठेवायचे?

**भाषेवरील अत्याचार.** आजकाल वृत्तपत्रांतून किंवा सरकारी सूत्रांकडून (?) इतके गचाळ मराठी वाचायला मिळते आणि टीव्हीवर ऐकावे लागते, की त्यापेक्षा हे नक्कीच चांगले आहे. हे पाहा नमुने.

**गतिरोधक पुढे आहेत.**

(म्हणजे वाहनचालक जणू गतिरोधकांचाच शोध घेतो आहे!)

प्रायोजित कार्यक्रम दिल्लीहून ओके होऊन यावा लागतो.

डॉ.... यांनी अशी लस शोधून काढली, जी पूर्वी कुणाला माहीत नव्हती.

चार दशलक्ष गॅलन पाणी. (चाळीस लक्ष का म्हणायचे नाही?)

माझी मुलगी 'निवडक' (Selective) आहे.

(लेखकाला 'चोखंदळ' हा शब्द माहीत नसावा.)

कृष्णा, रामा, रामचंद्रा, अशोका, विजयंता, विक्रांता....(हा काय प्रकार आहे?)

स्टायलिश इंग्रजी यावे, जमेल, तर अमेरिकन धाटणीचेच यावे, असे वाटते. पण मराठीच्या प्रकृतीप्रमाणे लिहिता-बोलता यावे, असे का वाटत नाही. सारा राग शब्दांवरच का? मुहुर्त, की मुहूर्त, हे माहीत नसते. पारंपारीक की पारंपरिक? अमुलाग्र, की आमूलाग्र? वरिष्ट, की वरिष्ठ? उद्ध्वस्थ, की उद्ध्वस्त? समाधिस्त, की समाधिस्थ?

या विषयावर 'भाषा आणि जीवन'च्याच दिवाळी, १९९३ च्या अंकात 'सल' ह्या नावाचा माझा एक स्वतंत्र लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यामुळे हा विषय इतक्यावरच थांबवतो.

**स्वगृही आलेले शब्द.** आणखी एक गमतीदार युक्तिवादही आपण करू शकतो. अनेक शब्द संस्कृतवरून फ्रेंचमध्ये, (लॅटिन मार्गे असेल) फ्रेंचमधून इंग्रजीत आणि इंग्रजीतून पुन्हा मराठीत असेही आले असण्याची शक्यता आहे. इंग्रजीतील ज्या शब्दांचे मूळ संस्कृत आहे, त्या शब्दांबद्दल तसा स्पष्ट खुलासा Webster's Universal Dictionary ने केला आहे. तिचा संदर्भ देऊन ही उदाहरणे देण्याचे टाळतो.

**समारोप.** परिभाषेबद्दल गेली कित्येक वर्षे माझ्या मनात वरील विचार राहून राहून येत आहेत. मी स्वतः गणित विषयावर पूर्वी अनेक पुस्तके लिहिली आहेत. त्यात मी 'शुद्ध' मराठी शब्द वापरले. पण त्यामुळे माझ्या पुस्तकांची उपयुक्तता कमी झाली, असे मला आता वाटते.

माझ्या ह्या दृष्टिकोनाबद्दल डॉ. भ. ग. बापट यांच्याबरोबर अनेकदा चर्चाही झाली आहे. शेवटी, त्यांनी एक निबंध लिहिण्याविषयी सुचवले. त्याप्रमाणे हा निबंध मी तयार केला आहे. कदाचित काही विद्वानांना हा दृष्टिकोन पसंत पडणार नाही. त्यांचे आक्षेप समजून घेण्यास मला आनंद वाटेल.

(**टीप.** गोखले इन्स्टिट्यूटच्या 'अर्थसंवाद'च्या जुलै-सप्टेंबर १९८५, च्या अंकात प्रसिद्ध झालेला माझा हा लेख 'भाषा आणि जीवन'च्या संपादकांना पुनर्मुद्रित करण्यासारखा वाटला, याचा मला आनंद होतो. मात्र, लेख अगदी जसाच्या तसा छापण्याऐवजी त्यावर काही संस्कार करावेत, असे मी डॉ. काळे यांना म्हटले. त्यांनी मान्यता दिल्यावर मधल्या काळच्या अनुभवाला अनुसरून काही कमी-जास्त केले आहे.

मी भाषातज्ज्ञ नाही. त्यामुळे माझ्याकडून काही चुका झाल्या असतील. त्या कुणी नजरेस आणल्या, तर दुरुस्ती करण्याची माझी तयारी आणि इच्छाही आहे.)

**राईलकर हॉस्पिटल, कदम वस्ती, पो. लोणी काळभोर, जि. पुणे. ४१२ २०१**

OOO

# परभाषकांसाठी तयार केलेली मराठीची पाठ्यपुस्तके
## इयत्ता : ६, ७, ८.

सुमन बेलवलकर

एखाद्या भाषेतले समृद्ध साहित्य हे प्रौढ परभाषकासाठी प्रभावी आकर्षण ठरू शकते आणि त्याच्या मोहाने तो भाषाशिक्षणाचे सर्व कष्ट घ्यायला तयार होतो, हे सत्य आहे. भाषाशिक्षणाच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर साहित्याचा उपयोग करून घेता येतो, हेही सत्य आहे. परंतु परभाषकाला भाषेचे शिक्षण म्हणून सुरुवातीपासून पूर्णतः साहित्याचेच शिक्षण द्यायचे, हे सर्वस्वी अशास्त्रीय आहे. अमराठी भाषक बालकुमारांसाठी बनवलेली पाठ्यपुस्तके पाहताना अगदी ठळकपणे लक्षात येणारी ही गोष्ट आहे.

ही पाठ्यपुस्तके आहेत कोणासाठी? ज्यांच्यासाठी ती बनवली आहेत, त्या विद्यार्थ्यांमध्ये एका बाजूला मराठी कुटुंबातून येणारी मुलं आहेत. कुटुंबात एखाद-दुसरा साक्षर असलेली- ओघानेच सर्व भाषाव्यवहार मराठीत करणारी मुलं यांत आहेत. दुसरीकडे अधिकाऱ्यांच्या वसाहतीत राहणारी, घरात किंवा शाळेच्या बसमध्येही मराठी कानांवर न पडणारी मुलं आहेत. या सर्वांना एकत्रितपणे भाषा शिकवण्यासाठी बनवलेल्या ६, ७, ८ वी च्या अभ्यासक्रमात दहा उद्दिष्टे मांडलेली आहेत. श्रवण-संभाषणादी भाषाकौशल्यांमध्ये पाठांतर ही क्षमता जोडून, काय अपेक्षित आहे, यासंबंधी सूचना दिल्या आहेत. व्याकरणासाठी नामापासून केवलप्रयोगी अव्ययांपर्यंत असलेला शब्दांच्या जातींचा अनुक्रम तीन भागांत विभागून तीन वर्गांसाठी वाटला आहे. अभ्यासक्रमात जरी 'सोप्या मराठीत' असे म्हटले असले, तरी त्याचे स्वरूप आणि सीमारेषा स्पष्ट नाहीत. तसेच, 'सोप्याकडून क्रमाक्रमाने अवघड' मानलेली श्रेणिबद्धताही फारशी शास्त्रीय नाही. उदा., मित्रांशी बोलणे सोपे - क्रमाने कुटुंबीयांशी, शिक्षक, नातेवाईक, इत्यादींशी बोलणे अवघड म्हणून ते वरच्या वर्गासाठी. तसेच, पाच ओळी श्रुतलेखन आणि - सात ओळी नंतर. ज-झ, न-ण उच्चारातील भेद आधी, पण 'ज्ञ' चा उल्लेखही नाही. पूर्णविराम व प्रश्नचिन्हांचा उपयोग सहावीत आणि अर्धविराम, अवतरणचिन्ह आठवीत, अशा प्रकारची ही श्रेणिरचना आहे. या रूपरेषेनुसार अध्यापन ५०। . यासाठी बनवलेली जी पाठ्यपुस्तके आहेत, त्यांच्यामध्ये इतकाही

अनुक्रम नाही. 'पत्र' हा एकच भाग घेतला, तरी सहावीच्या पुस्तकात व्यवसायपत्र, ७ वीच्या पुस्तकात दोन्ही प्रकारची पाच पत्रे आणि आठवीसाठी असलेले साने गुरुजींनी लिहिलेले 'सुंदर पत्र' आहे. अनौपचारिक साधी चिठ्ठी प्रथम, नंतर घरगुती पत्रे आणि शेवटी व्यावसायिक पत्रे असा साधा क्रम सांभाळला असता, तर ते उचित ठरले असते.

आरंभीच म्हटल्याप्रमाणे सर्वच पाठ्यपुस्तके बहुतांशी साहित्यातल्या गद्य-पद्य उताऱ्यांचे संकलन या स्वरूपाची आहेत. त्यातही आजवर चालत आलेला एक दृढ समज परभाषाशिक्षणाच्या किती आड येतो, याची कल्पना ते बनवणाऱ्यांना आहे, असे दिसत नाही. हा समज म्हणजे पाठांची, कवितांची मांडणी मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या कालानुक्रमेच राखली जावी. त्यामुळे पहिला पाठ लोकहितवादींचा, पहिली कविता ज्ञानेश्वर किंवा तुकारामाची अत्यावश्यक! जणू त्यांचे पाठ शेवटी आले, तर त्यांचा अग्रपूजेचा मान आपण डावलला, असे होईल. भाषा बारा कोसांवर बदलते, त्यापेक्षा अधिक बारा वर्षांच्या टप्प्यांनी बदलते. बाराव्या शतकातल्या (तेराव्या म्हणू) मराठी साहित्याचा उतारा नवी भाषा म्हणून शिकणाऱ्या आजच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीने 'आरंभ' होऊ शकत नाही. आपल्या भाषेतले साहित्य वाचणे सक्षम व्यक्तीला चालण्यासारखे सहज वाटते. पण दुसऱ्या भाषेतले साहित्य वाचताना त्याला गिर्यारोहणाचा अनुभव येतो. म्हणून आपल्या साहित्यातल्या कांचनगंगा, एव्हरेस्टसारख्या अत्युच्च शिखरांचा आपल्याला कितीही अभिमान वाटला, तरी परभाषकाला गिर्यारोहणाचे पाठ देण्यासाठी कांचनगंगाच्या शिखरापासून सुरुवात करणे व्यवहाराचे नाही.

इतर पाठ्यपुस्तकांमध्ये आढळणारी आणखी एक गोष्ट याही पुस्तकांमध्ये दिसते. ती म्हणजे, या पुस्तकांची पुरुषप्रधानता. केवळ भाषेचा विचार करायचा, तरी जिथे विद्यार्थ्यांमध्ये बरोबरीने मुली आहेत, शिक्षकांमध्ये शिक्षिकाच निर्विवादपणे बहुसंख्य आहेत, असे असताही या पुस्तकांमध्ये मुलींची भाषा, मुलींचे भावविश्व यांना अगदीच कमी स्थान आहे. अमराठी मुलींना मराठी शिकवण्याची जबाबदारी या पुस्तकांवर नाही काय? या पुस्तकांत स्त्रियांचे स्थान काय? आठवीच्या पुस्तकात मदर तेरेसा, हिरकणी बुरूज, लक्ष्मीबाई टिळक यांच्याबद्दलचे पाठ एकीकडे आणि दुसरीकडे मुंबईच्या वर्णनात पुरुषी नजरेतून केलेलं हे वर्णन - 'जुहूच्या किनाऱ्यांवर काही माणसे नुसतीच आपली शरीरे दाखवत असतात. त्याखेरीज नाना रंगांच्या साड्या, फ्रॉक्स, सलवारी, दुपट्टे, बेलबॉटम आणि स्ट्रेच पँटस् पेहेरलेल्या तरुण आणि वयस्कर स्त्रिया हवा खात, सुगंध उधळीत येरझाऱ्या करीत असतात, त्या वेगळ्याच. त्यांच्या वेगवेगळ्या रंगांच्या आकृती किनाऱ्यावर उभ्या होतात. (?) त्यामुळे केव्हा केव्हा जुहूचा किनारा फुलांच्या बागेसारखा दिसतो.' हे वर्णन बारा वर्षांच्या मुलामुलींसाठी कोणत्या हेतूने ठेवले गेले, हे फक्त ठेवणारेच जाणोत.

मुलांचा वयोगट ध्यानात घेऊन त्यांचे भावविश्वच पुस्तकात आले पाहिजे, मग ती स्वभाषा असो, की परभाषा. इथे आठवीच्या पुस्तकात वेगवेगळया ठिकाणी दिसणाऱ्या मुंग्यांना फसून शर्यत हरणारा मूर्ख हत्ती, पाहुणचार करणारा जादूचा पोपट यांचे पाठ आहेत. उद्योगी होण्यासाठी सासऱ्याचे चांगले घर पाडणारा जावई, ग्रंथालयातील पुस्तके चोरणाऱ्या विद्यार्थ्याला पुस्तकचोर म्हणून सगळया वर्गात हिंडवून शिक्षा करणारे मुख्याध्यापक सातवीच्या पुस्तकात आहेत. रात्री मुलांसाठी कार्यक्रम असणारा रेडिओ सहावीच्या पुस्तकात आहे. अशा बाळबोध किंवा विनोदाच्या नावाखाली मूर्ख, हास्यास्पद गोष्टी परभाषा म्हणून मुलांनी का स्वीकाराव्या? दुसरीकडे उद्यमनगर, 'देहे त्यागिता कीर्ति मागे उरावी' या त्यांच्या आवाक्यापलिकडच्या गोष्टी! 'अज्ञात हुरहुरीपासून निर्माण होणारा भावनावेग सोसणे कठीण झाल्यावर...' 'तो विशाल विविधस्वरूपी, रंगीबेरंगी, मनोहारी निसर्ग तिला प्रतिपरमेश्वरच वाटला.' ही मदर तेरेसांची मनोऽवस्था परभाषेतून या विद्यार्थ्यांनी जाणून घ्यावी, ही अपेक्षा करणारे जरा जास्त महत्त्वाकांक्षी आहेत, असे म्हणावे लागेल.

भाषेच्या पुस्तकाचे लेखन करतानाही ठरावीक विषय आणि आशय डोळयांसमोर ठेवून, त्या पुस्तकांची आखणी केली आहे ,असे वाटते. त्यामुळे सर्व पाठ्यपुस्तकांमध्ये एकूणच थोरांच्या गोष्टी, उपदेशपर पाठ जास्त असतात. या थोरांबद्दल लिहिताना शेर्पा तेनसिंग, मिहिर सेन, अहल्याबाई होळकर, झाशीवाली आणि पैगंबर यांची एकत्र किंवा न्यायमूर्ती रानडे, एकनाथ आणि विवेकानंद एकत्र अशा कोणाचीही एकत्र माळ केली जाते. त्यात मिहिर सेन यांचे सेन हे आडनाव आहे, याचीही माहिती लेखकाला नाही. 'तुम्ही निर्भय व्हा' पासून सर्व प्रकारचा उपदेश प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष आढळतो. 'अंगावर ओढलेल्या चिपाडांनीच जर शहाणपण येत असतं, तर समस्त जनावरं शहाणपण नसती का शिकली?' असं माडगूळकर म्हणतात. उपदेशपर साहित्याचा परिणामही यापेक्षा वेगळा नसतो. पण आपण हे ध्यानात घेत नाही.

मुलांची भाषिक गरज ध्यानात ठेवून आखलेले पाठ या पुस्तकांमध्ये आहेत. उदा., डाकघर (मराठी माणूस हा शब्द वापरत नाही), प्राणिसंग्रहालय, मंडईतला फेरफटका या विषयांवर पाठ आहेत; परंतु या विषयांवर भाषेच्या दृष्टीने पाठ लिहायचे प्रशिक्षण लेखकांना मिळाले नसावे. उदा., प्राणिसंग्रहालयाच्या पाठात सातवीचा मुलगा, 'गुरुजी, या ठिकाणाला प्राणिसंग्रहालय असं का म्हणतात?' असं विचारतो. प्राण्यांचे मुख्य प्रकार जंगली-पाळीव असे नसून, मांस खाणारे आणि मांस न खाणारे असे ते वर्णन चालते. डाकघरात सुद्धा, मनिऑर्डर म्हणजे काय, हे माहीत नसलेला मुलगा (इथेही मुलगाच) 'किती कमिशन घेतात, रे, मनिऑर्डर पाठवायला' असा पुढचाच प्रश्न विचारतो. सहावीच्या पुस्तकातला 'मंडईवरचा पाठ' आपल्याला भाषा शिकवायची आहे, हे लक्ष्य मोडून भलतीकडेच नेम धरून आहे. 'मंडई म्हणजे काय' इथून पाठ

सुरू होतो. ह्या भाजीला मेथी म्हणतात.. आम्ही याला मिरची म्हणतो... याप्रकारे पाठ पुढे जातो. 'आज तू दिलेली सर्व माहिती मी वहीत लिहून ठेवणार आहे' इथे तो संपतो. महाराष्ट्रात मंडई विद्यापीठात तरी अजून मराठी टिकून आहे. हा पाठ शिकून कोणाला मिरची-कोथिंबीर सुद्धा आणता येणार नाही. मंडईत कानांवर पडणारी भाषा, हव्या असलेल्या वस्तूंची चौकशी, भाव, घासाघीस, भाज्यांच्या वर्णनासाठी असलेले शब्द हे सर्व सोडून मिरची म्हणजे काय, अशा 'ज्ञाना'साठीच धडा खर्ची पडतो. पाठाखाली विचारलेला एक प्रश्न 'कोशिंबिरीत कोणते पदार्थ वापरतात' असा आहे. स्वाध्यायात पालेभाज्या आणि फळभाज्यांचा तक्ता भरा, गुच्छ-घड, इ. शब्दांची अनावश्यक माहिती आहे. 'माहिती देणे' म्हणजे भाषा शिकवणे नाही, हे प्रथम ध्यानात घ्यायला हवे. विशिष्ट भाषिक संरचना शिकवण्यासाठी शिकणाऱ्यांना योग्य असे प्रसंग निवडून पाठाचे लेखन करता येते. केवळ एकच एक वाक्यरचना शिकवायला सुद्धा अगदी समर्पक प्रसंग घेऊन आकर्षक पाठ बनवता येतो. पण त्या आधी कोणाला, काय, कशासाठी आणि कसे शिकवायचे, याची स्पष्ट कल्पना शिकवणाऱ्यांना हवी. उदा., 'माहिती' हे लक्ष्य ठेवून 'राष्ट्रीय पक्षी मोर' हा पाठ लिहिला, हे ठीक आहे. पण मराठी भाषेबद्दल प्रेम निर्माण होणे हे अभ्यासक्रमातले एक उद्दिष्ट साधायचे असेल तर गदिमांची 'नाच, रे, मोरा' ही कविताच तिथे हवी. प्रत्यक्षात मात्र या पाठाखाली 'ही कविता वाचा' अशी सूचना आहे.

एकूणच विद्यार्थ्याने शिकून घेतलेली भाषा- तिचे वर्तुळ हा आरंभ-बिंदू-ठरवून पुस्तकाची रचना व्हायला हवी. क्रमाने आकलनक्षम, आकलनाला जवळची, आवडेल, अशी थोडी पुढची आवडेल, अशी निवडतानाही ती आत्मसात होईल, अशी, याप्रमाणे भाषेची पातळी ध्यानात ठेवायला हवी. आकलनाच्या आणि आत्मसात केलेली भाषा वापरण्याच्या कक्षा विस्तारत जाणे हा परभाषा शिक्षणात विकासाचा आलेख मानावा.

मातृभाषा म्हणून मराठी शिकणाऱ्या मुलांसाठी बनवलेली पाठ्यपुस्तके डोळ्यांसमोर ठेवूनच या पुस्तकांचे लेखन झाले असावे, याची आणखी एक खूण, म्हणजे यातला लेखक आणि कवींचा परिचय. हा परिचय आठवीपासून दिला आहे, याचाच अर्थ तो विद्यार्थ्यांसाठीही आहे. पण त्याची भाषा पाहा - 'आपली झुंजार लेखणी व प्रभावी वक्तृत्वशैली त्यांनी महाराष्ट्राला नवी जागृती, नवी प्रेरणा, नवा जीवनानंद देण्यासाठी अहर्निश झिजवली' हा अत्र्यांचा परिचय आहे. 'नव्या मनूची व नव्या मानवाची गाणी त्यांनी द्रष्टेपणाने गाइली व बंडखोरीची व क्रांतीची 'तुतारी' प्राणपणाने फुंकली' 'केशवसुत', 'श्रीकृष्ण पोवळे भैरवीसारखी (वा) थयथय नाचणारी आपली क्रांतिकारी व अग्निदाहक कविता घेऊन अवतीर्ण झाले. त्यांची कविता अन्याय व विषमतेविरुद्ध बंड करून उठते व समाजात युगानुयुग थैमान घालणाऱ्या जीर्ण व जाचक रूढींवर मूर्तिभंजक होऊन निष्ठुर प्रहार करते.' हे परिचय 'मराठी' घेऊन एम्. ए. झाल्यावर

या विद्यार्थ्यांना समजतील.

अध्यापनाच्या दृष्टीने पाठ्यपुस्तक तयार करणाऱ्यांनी स्वतः लिहिलेला महत्त्वाचा भाग, म्हणजे शब्दार्थ आणि स्वाध्याय. या तीनही पुस्तकांच्या शब्दार्थांवरून सहज नजर टाकली, तरी लक्षात येते, की दुसरी भाषा म्हणून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या अडचणींची ते लिहिणाऱ्यांना कल्पना नाही. उदा., मराठी नामांचे लिंग परभाषकाला ओळखता येत नाही. कारण ते ओळखण्याची शब्दांतर्गत काही खूण मराठीत नसते. म्हणून नवे नाम सांगताना त्याचे लिंग आवश्यक असते. त्याशिवाय वाक्यरचना करणे शक्य होत नाही. सामान्यरूपाबाबतही जिथे एकाच प्रकारच्या नामांचे भिन्न गट असतात (उदा., भिंतीवर/काचेवर) तिथेही नवे नाम कोणत्या गटातले आहे, हे सांगावे लागते. ही झाली तांत्रिक बाब. अर्थाची बाजू तपासली, तर असे अनेक शब्द सापडतात, की ज्यांचा अर्थ दिलाच नाही. उदा., कैवारी, माधुकरी, सलकडी, कावड, म्होरक्या, पांगणे, (६वी) लकेर, दुर्धर, डोंबारी, बिबिटा, घडवंची, वाकुल्या दाखवणे (आम्हां जमीन) माने, वाफा, स्वस्थता, कानस, मुसंडी मारणे, आटकी, कणखर, टेंगळं, चुणूक, सामुद्रधुनी, निकराने,

(७वी) खंदा, उष्टेखरकटे, इ.

झाप, भाते पसवणे, खाचर, शिंके, रममाण, भीडभाड, मंडळीला (पक्षिणीला उद्देशून), हुमदांडगे, मायेची पाखर,

(८वी) पडवी, पाणी तरळणे, निःपात, सैरावैरा, ढोर, इ.

या उलट जे शब्द भारतीय विद्यार्थ्यांना सर्वसाधारणपणे माहीत असतात, अशा अनेक शब्दांनी शब्दार्थात जागा अडवली आहे. उदा., भूमी, स्वाभिमान, देवदूत, नवरत्न, मूर्तिकार, सुगंध, लोकप्रिय, स्वर्गीय इ. - ६ वी.

नाइलाज, हिंमत, नगर, दानशूर, स्तंभ, रक्षण, नास्ता- ७ वी.

बायबल, अपूर्व, पोशाख, प्रेक्षक, दृष्टी, पावन, छाया, सन्मान करणे, अनाथ, अपंग, मंगल, अमर - ८ वी.

मूळ शब्दापेक्षा दिलेला अर्थ अवघड याची उदाहरणेही मिळतात.

उदा., मूर्ख - अजागळ, हिडीसफिडीस करणे - तुसडेपणाने वागणे, परडे - परसू, डोईजड - शिरजोर, वावडणी —मळलेले धान्य वाऱ्यावर उफणणे. काही ठिकाणी मूळ शब्दाचा खुलासा बाजूला राहतो आणि तिसराच अनोळखी शब्द पदरात पडतो. उदा., सोन्याचे ताट - ज्वारी कापणीला येते, त्या वेळी सोन्यासारखे पिवळे दिसणारे ताट (?), गोपाळकाला - श्रीकृष्ण व गोपाळ आपल्या 'शिदोऱ्या' एकत्र करून खात, तसा काला.' परभाषकाला अडणारा शब्द कोणता, हे नेमके समजले असते, तर हा दोष टाळता आला असता.

परभाषकांसाठी शब्दार्थ देताना आणखी एक खबरदारी घ्यावी लागते. अर्थाची

छटा जर अचूक दिली नाही, तर दिलेल्या शब्दार्थांच्या आधारे भलत्याच ठिकाणी त्यांचा वापर होण्याची शक्यता असते. उदा., कोडे (मुलांना घालतात, ते)-गूढ प्रश्न, हवाली करणे- देणे. वेळ निभावून नेणे - कशीबशी वेळ काढणे (?) (इथे निभावून नेतात, ती वेळ स्त्रीलिंगी आणि कसाबसा काढतात, तो वेळ पुल्लिंगी आहे.) मज्ञाव - अडथळा, काहीबाही - निरर्थक, मोकाट जनावरे - स्वच्छंदी, स्वैर जनावरे, स्फूर्ती - अनावर इच्छा, शुभ आणि श्रेय दोन्हींसाठी कल्याण, ओक्साबोक्शी - जोराने, ऐदी - आळशी. या ठिकाणी दुसऱ्याऐवजी पहिला वापरला, तर? काही शब्दार्थ तर केवळ निष्काळजीपणाने दिलेले आहेत. उदा., सुळे - प्राण्यांचे पुढचे तीक्ष्ण दात. हे माणसांना नसतात का? हाहाकार होणे - ओरड होणे, गोंधळ माजणे हा अर्थ मानला, तर विधानसभेत, लोकसभेत रोजच हाहाकार होतो, असे म्हणावे लागेल. असे आणखी काही शब्द. पारखा - विन्मुख, अपरिचित, लहडलेल्या - बहरलेल्या, रुजणे - मुरणे, कूच करणे- कामावर निघणे, डोळयांत प्राण येणे - मरायला टेकणे, पालवी फुटणे - अंकुर फुटणे, सिंहासन-राजांनी बसावयाचे आसन, खेद - दु:ख.

ही उदाहरणे देण्यामागे चुका दाखवण्याचा हेतू आहे, असे नाही. शिकणाऱ्या गटाची कल्पना स्पष्ट नसल्यामुळे हे घडले, हे कारण अधोरेखित करण्याचा हेतू आहे.

जी गोष्ट शब्दार्थाची, तीच गोष्ट स्वाध्यायांची. स्वाध्यायात आपण पाठाच्या आशयावर आधारलेले प्रश्न, संरचनांवरचे प्रश्न, व्याकरणाचे प्रश्न आणि पूरक लेखन-वाचनासंबंधीच्या सूचना यांचा समावेश करू. भाषाशिक्षणात स्वाध्यायाचे महत्त्व फार असते. एखाद्या सामान्य उताऱ्यावरदेखील योग्य प्रश्न काढून विद्यार्थ्यांची भाषिक अभिव्यक्ती वाढवता येते. पण प्रत्यक्षात आजही संस्कृतातले संधीचे नियम, समासांचे विग्रह आणि उदाहरणे, समानार्थी --विरुद्धार्थी शब्द घडवणे, इत्यादींचे जोखड उतरून ठेवायला आपण तयार नाही. आपले प्रश्न बहुतांशी विद्यार्थ्यांच्या पाठांतराची चाचपणी करणारे असतात. एकावरून दुसऱ्या – नवनव्या रचनांना चालना देणारे प्रश्न विचारण्यावर आपण भर देत नाही. डॉ. ना. गो. कालेलकरांच्या १९६२ साली प्रकाशित झालेल्या पुस्तकातील 'पायाशुद्ध मराठी' या निबंधात म्हटले आहे, की 'कमळाला असणारे पन्नास प्रतिशब्द माहीत असण्यापेक्षा पन्नास इतर फुलांची नावे माहीत असणे ही अधिक महत्त्वाची गोष्ट आहे.' बत्तीस वर्षे उलटूनही या विचारांची अजून योग्य दखल घेतली गेलेली नाही. जुंन्या, झापड लावलेल्या प्रश्नांमध्येही सुसूत्रता नाही. स्त्रीलिंगी शब्द बनवण्यासाठी ईण प्रत्यय लागतो हा खुलासा द्यायचा आणि प्रश्नात शब्द मात्र नायक (८वी) द्यायचा याला काय म्हणावे? पाठात आली असेल, ती रचना हे धोरण ठेवल्यांवर संरचनांमध्ये प्रथम सोपे – क्रमाने अवघड, अशी जी रचना हवी, ते कसे शक्य आहे? परिणामी कोणताच खुलासा न देता निरनिराळया शब्दांचे सामान्यरूप द्या, हा एकच प्रश्न पुन्हा पुन्हा येत राहतो. भाषाशिक्षणात अशा

स्वाध्यायांचा उपयोग होत नाही, इतकेच.

शेवटी सामान्यपणे पाठ्यपुस्तकाबद्दल अपेक्षा व्यक्त करायच्या, तर इतकेच म्हणता येईल, की ते ज्या परभाषक विद्यार्थ्यांसाठी बनवायचे, त्यांच्या भाषिक पार्श्वभूमीचा विचार सर्वांत महत्त्वाचा आहे. त्यांचा वयोगट, भावविश्व यांना अनुकूल असा पाठांचा आशय हवा. मराठी संरचनांचे ज्ञान त्यांना श्रेणिबद्ध क्रमाने होईल, याची दक्षता घेतली जावी. जी भाषा मुलांना समजते, आवडते, सहज ध्यानात राहते, आत्मसात करता येते आणि उत्साहाने बोलता येते, अशीच भाषा पुस्तकात असावी. व्यवहारातली, सहज कानांवर पडणारी, सहज वाचायला मिळणारी, आजसुद्धा सहज कळणारी 'आजची' भाषा त्यांना आधी आली पाहिजे. ज्याला भाषा यायला लागली, तो पु. ल. किंवा तुकाराम वाचल्याशिवाय राहणार नाही. त्यासाठी येणेप्रमाणे, करावयाचे, व्हावयाजोगा, गगनमध्यावरून, रागेरागे असे वस्तुसंग्रहालयात जमा झालेले शब्द शिकवण्याची काही गरज नाही. सहावीच्या अमराठी मुलांना 'आपल्या बांधवांच्या गरिबीचा विचार करून स्वतःला बहुमोल अलंकार नाकारणारा हा मुलगा म्हणजे न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे हे होत.' हे अठरा शब्दांचे लांबलचक वाक्य शिकवले, तरी ना रानडे शिकवले, ना मराठी, अशीच स्थिती होईल.

**मराठी विभाग, पश्चिम विभागीय भाषाकेंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे ६.**

(३ व ४ मे, १९९४ रोजी मराठी अभ्यास परिषद आणि महाराष्ट्र राज्य मराठी विकास परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने 'मराठी विषयातील पाठ्यपुस्तके' या विषयावर घेण्यात आलेल्या चर्चासत्रात वाचला गेलेला निबंध)

○○○



अनुक्रमणिका

# घरगुती भाषेसंबंधी

सुप्रिया केळवकर

ऱ्याच दिवसांनी कोणीतरी कोणाला तरी रांधून वाढल्याचं ऐकलं आणि कान चटकन् २०-२५ वर्षं मागे गेले. आमची आई 'रांधा-वाढा करण्यात' आयुष्य गेलं! असं म्हणायची. आता आम्ही 'स्वयंपाक' न करता जेवण बनवायला लागलो आहोत. मुलं 'पाटपाणी' घेऊन –मुली पान वाढत नाहीत, तर ताटं मांडायला लागल्या आहेत. 'उष्टी- खरकटी' काढायची नसतातच. तर टेबल–ओटा आवरून टाकायचा असतो. सकाळ-संध्याकाळचे 'केरवारे' कधीच संपले!

असेच काहीसे 'आत्ता होते, गेले कुठे?' म्हणावेसे वाटणारे पुष्कळसे घरगुती शब्द आठवले, ते स्मरणात राहवेत, म्हणून हा प्रपंच.

पूर्वी आमच्या हातून धांदरटपणे 'सांडलवंड' व्हायची. आता हातून पडतंच! सांडलवंड म्हणतानाही हाताला न पेलणाऱ्या भांड्याचा झालेला 'तिरपा-कटाक्ष'आणि त्यातून सांडलेले पाणी अथवा तत्सम पातळ पदार्थ अजूनही डोळ्याला दिसतो. सध्या काचाही फटकन् फुटतात. काचेचं 'तडकणं' किंवा बांगडीचं 'वाढवणं' राहिलं नाही. दिवा विझवला जातो किंवा लाइट ऑफ होतो, 'मालवायचं' विसरून जायला झालंय्. या सगळ्या शब्दांमधले चित्रदर्शित्व आणि नेमका भाव आताच्या इंस्टंट–फास्टफूडच्या जमान्यात हरवला आहे.

परवा कोणी तरी सरळ 'तिचा' जीवच घेतला आणि स्वतःचाही घेतलाच! मग जिवाला जीव देऊन समोरच्या वरून 'ओवाळून' टाकणं कुठलं राहणार!

लहानपणी गरम चहा-दुधाने जीभ 'पोळायची', आता डायरेक्ट भाजते! वाफेच्या किंवा पदार्थाच्या चटक्याची होरपळ आम्ही विसरूनच गेलो. मग 'फुंकून पिणं' बाजूलाच राहिलं. 'कणीक, मळली, तिंबली जाऊन पोळयांचा रद्दा लाटला' जायचा. सध्या 'पीठ' पटकन् भिजवून, चटकन् पोळ्या केल्या जातात. मग पोळीचा 'पापुद्रा' समजावून सांगताना 'नाकी नऊ' येतात. पोळया 'ऊन- ऊन' असत आणि भाजी आमटी 'कढत-कढत' – तेव्हाची ही गोष्ट आहे. आता सगळंच गरम!

भाजी विळीवर चिरली जात नसेल, तर कटिंग बोर्डवर 'कापल्याच' जाणार.





अनुक्रमणिका

ठरवलेल्या बेतावर 'विरजण' पडणार नाही. 'मूड ऑफ होईल' कारण 'दूध विरजलं' जात नाही, तर 'दही लावलं' जातं. नाटकाचा बेत 'रहित' न होता कॅन्सलच होतो!

संसाराच्या तापाने आमची आई-मावशी बापडी 'गांजून' जायची. आता 'गांजणे' तुकारामांच्या अभंगात वाचायला मिळतं. माझ्या आतेबहिणीने मद्रासी माणसावरोवर लग्न केलं, तेव्हा आतोबांच्या संतापापुढे आत्या 'मूग गिळून' बसली होती. कारण तिने सगळी मुभा दिलेल्या लेकीने डोक्यावर 'मिरे वाटले' होते. आता सगळं 'फ्रीडम' असल्यामुळे आई-मुलीचं तेवढं 'मेतकूट' ही नसतं. त्यामुळे मॉडर्न आयांचे जीवही 'मेटाकुटीला' येत नाहीत.

काही चुकलं, तर पूर्वी 'फजिती' होत असे. नंतर 'पचका' होऊ लागला. 'पोपट' ही होतोच, मग 'सगळाच राऽऽडा!'

आमची आजी सुगरण. तिच्या हातचे पुरणपोळी, चिरोटा, कडवोळीसारखे निगुतीचे पदार्थ 'अलवार' होत असत, तेव्हा 'मायेचा कढ' यायचा आणि चुलीच्या 'वैलावर' भाजी-आमटीला 'कढही दिला' जायचा. तिखट-मीठ कमीच झाले, तर तिच्या मते आईचा स्वयंपाक 'भोळसट' व्हायचा.

हल्लीच्या अभ्यासाच्या 'टेंशन'ने मुलं 'वीक' होतात, मग आया त्यांना 'टॉनिक्स' देतात. आमच्या शेजारच्या स्कॉलर बाळयाचे जरत्कारू पाप्याचं पितर झाल्यावर आजोबांनी त्याला व्यायामशाळेत दामटवून बदाम-खोबऱ्याचा 'खुराक' चालू केला होता.

शतपावली, वामकुक्षी, केरसुणी, परवचा, सांजवात, पलंगपोस, वेणीफणी असे पुष्कळसे शब्द आता हरवले आहेत. या सर्व शब्दांचा मागोवा घेताना जाणवलं, की पूर्वीच्या आजी-आईच्या कामांना 'ग्रेडेशन' होतं. पायरीपायरीने कामे होत असत. आता जमेल, ते, जमेल तेव्हा, कसंही काम उरकावं लागतं. कारण जीवनाचा वाढता वेग आणि अपुरा वेळ! त्यामुळे शब्दही स्वतःचं रूप गमावून बसले आहेत. पुष्कळशा शब्दांची आता गरजही भासत नाही. तेही विचारे आमच्यासारखे उठवळ आणि 'चटावरचे' झालेत! कारण सध्या भाषेच्या 'धावण्यात' ते मागे पडलेत!

**५, चिनार, कृ. ब. जोशी मार्ग, शिवाजी नगर, पुणे ४११ ००५.**

## 'ण' च्या निमित्ताने

**प्रवीण दामले**

दोन निरनिराळ्या अनुभवांतून एक महत्त्वाची गोष्ट सापडली आहे, असं वाटतंय्. आकाशवाणीच्या नाटकाच्या स्वरचाचणीसाठी मी आणि माझा मित्र सराव करीत होतो. मित्राला न आणि ण यांच्यांत भेद करता येत नव्हता. पानी, आपन, म्हनून असे शब्द



अनुक्रमणिका

तो उच्चारीत होता; परंतु आणि या शब्दात मात्र तो मुळीच चूक करीत नव्हता. त्याला वारंवार ण चा उच्चार करायला सांगताना मी सुद्धा ण म्हणत होतो. अचानक लक्षात आले, की ण चा उच्चार करताना आपली जीभ सुरुवातीला ण च्या अर्धगोलाप्रमाणे होते, तर न उच्चारताना जिभेच्या टोकाशी आपण नसारखी गाठ केल्यासारखे करतो आणि  न उच्चारतो.

दुसरा अनुभव एका दोन्ही कानांनी कमी ऐकू येणाऱ्या मुलीने दिला.

तिला तिच्या आईने कोंबड्याचे चित्र काढायला सांगितले. तिने एका पक्ष्याचे चित्र काढले आणि त्याला नाव दिले. नाव देताना 'कोंबडा' असा स्पष्ट शब्दोच्चार तिने केला. तिला बाकीचे नीट बोलता येत नाही. कोंबडा या शब्दामधला ओकार, आकार आणि अनुस्वार तिने त्या नावात काढला होता.  पण तिने अक्षरे निराळीच काढली होती. कारण तिला क, ब, इत्यादी, अक्षरे ठाऊक नव्हती. वर म्हटल्याप्रमाणे प्रत्येक अक्षर काढण्याची पद्धत आणि उच्चारण्याची पद्धत यांचा जर संबंध असेल, तर सगळयाच व्यंजनांचा अभ्यास करायला हवा. त्या मुलीला 'क' या आकृतीला काय म्हणतात, हे ठाऊक नव्हते; पण तिने स्वरचिन्हे मात्र योग्य पण विस्कळीत क्रमाने काढली होती.

जिभेने वळण दिल्यामुळे मनात उभ्या राहणाऱ्या प्रतिमेला आपण रेखांकित करतो, त्याला अमुक म्हणतात, हे आपल्याला काढत असलेल्या आकाराबद्दल  जिभेच्या क्रियेने पटते. म्हणजेच अक्षर शिकण्यात केवळ कान आणि हातच नव्हेत, तर जीभही महत्त्वाची भूमिका या प्रकारे बजावते. मी भाषेचा तज्ज्ञ नाही. विद्यार्थी आहे. याच कारणासाठी हा अनुभव सर्वांसमोर मांडावा, असे वाटले.

**कर्वे समाजसेवा संस्था, १८, हिलसाईड, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२**

○○○

# ‘भाषण’ आणि ‘व्याख्यान’

स. ह. देशपांडे, मंगला गोडबोले

लेखनाचे जसे ‘वैचारिक’ आणि ‘ललित’ असे दोन प्रकार मानले जातात तसे वक्तृत्वाचेही मानले पाहिजेत. वैचारिक वक्तृत्वात विचार व त्यांची सुस्पष्ट व सुसंगत मांडणी यांची आपेक्षा असते. ही संगती ताकीक स्वरूपाची असते. अशा वक्तृत्वाचं आवाहन श्रोत्यांच्या बुद्धीला असतं. ज्या मानानं विचार किंवा त्यामागचा युक्तीवाद नवीन त्यामानानं अशा वक्तृत्वाचा दर्जा उंचावतो. विचारांची उकल करताना उदा., दृष्टांत यांचा वापर ज्या प्रमाणात होईल त्या प्रमाणात हे वक्तृत्व रंजकही होईल. पण ही रंजकताही बौद्धिक असेल. याउलट, ललित वक्तृत्व हा मुख्यतः भावनांशी खेळ असेल. श्रोत्यांना राग आणणं, त्वेष आणणं, हसू आणणं, त्यांची अनुकंपा किंवा कारूण्य जागृत करणं अशी ललित वक्तृत्वाची उद्दिष्ट असतील. उच्च प्रतीच्या ललित वक्तृत्वात उत्स्फूर्त कल्पना विलास आणि क्वचित भावकाव्याची डूबही जाणवेल. ते ‘भाषण’ असेल, ‘व्याख्यान’ नसेल.

पु. ग. सहस्त्रबुद्धे, लक्ष्मणशास्त्री जोशी इत्यादींचं वक्तृत्व पहिल्या प्रकारात घालावं लागेल. उत्तम वैचारिक वक्तृत्व बाह्य घटकांच्या दृष्टीनं उणं असलं तरी त्यातल्या सूक्ष्म विश्नेषणानं प्रभावी ठरू शकते. ऑक्सफर्ड विद्यापिठातले अर्थशास्त्राचे प्राध्यापक सर जॉन हिक्स हे तोतरे होते; पण मुंबई विद्यापिठाच्या दिक्षादान सभागृहात त्यांचे विचार ऐकण्यासाठी श्रोत्यांनी गर्दी केली होती. या प्रकारचं आपल्याकडचं उदाहरण न्या. महादेव गोविंद रानडे यांचा आहे. नामदार श्रीनिवास शास्त्रींनी त्यांचं मद्रासला पहिलं भाषण ऐकलं त्याची आठवण सांगितली आहे. : रानड्यांचं ओंगळ खाकरणं त्यांच्या नाकातून ओघळणारी तपकिर यामुळं त्यांना प्रथम शिशारिच आली; पण पुढे रानडे एका विषयाच्या सूक्ष्म, सुबोध आणि समतोल विवेचनात शिरले आणि शास्त्री त्यांचे जन्माचे भक्त झाले!

शिवरामपंत परांपप्यांच्या वक्तृत्वाविषयी आपण ऐकलं आहे. त्यावरून कल्पना होते की, ते मुख्यतः ललित स्वरूपाचं असावं. सावरकरांनी शनिवार वाड्यासमोर परदेशी कपड्यांची होळी रचली तेव्हा एकेक कपडा उचलून अग्नी समर्पण करताना शिवरामपंतांनी आपल्या उद्गारांनी श्रोत्यांची अंतःकरणही ब्रिटीश सत्तेविरूद्ध पेटवली होती. सेक्सपिअरच्या ज्युलियस सिझर नाटकातलं, सिझरच्या पार्थिव देहाजवळ उभं





अनुक्रमणिका

राहून केलेलं मार्क ॲंटनीचं भाषण हा तर ललित वाङ्मयाचा उत्कृष्ट नमूना गणला पाहिजे. हे भाषण कुठल्याही तत्त्वाचं प्रतिपादन करित नाही. ते फक्त सिझरचा थोरपणा सांगतं आणि त्याला मारणारे कटवाले कसे नमकहराम आहेत हे दाखवून देतं. उपहास, व्यंगोक्ती, अतिशयोक्ती, कृतकनाट्य ही या भाषातली ॲंटनीची अयुधं आहेत आणि त्यांचा विलक्षण प्रभावी उपयोग करून तो श्रोत्यांना संतापाचे कड आणतो.

हा जो भेद आपण केला आहे तो तात्विक आहे. व्यवहारातील भाषणं ही अनेकदा मिश्रण असतात. म्हणजे असं की प्राय:हा वैचारिक असलेल्या भाषणात भावनिक उत्तेजक मूळीच नसतात असं नाही किंवा प्राय:हा ललित असलेल्या भाषणात वैचारिक अंश औषधालाही सापडत नाही असं नाही. पुलंची भाषणं लालित्याच्या टोकाकडं झुकणारी म्हणून ती 'ललित' या सदरात टाकली पाहिजेत. याचा अर्थ ललितगद्याला आपण जशी वेगळी मोजपट्टी लावतो तशी ललित वक्तृत्वाला लावली पाहिजेण असं केलं नाही तर आपण पुलंच्या वक्तृत्वाचा निट आस्वाद घेऊ शकणार नाही.

आता लक्षात येईल की पुलंच्या वक्तृत्वाविषयीची मतं-मतांतर बाजूला ठेवून आपण जो विश्लेषणाचा प्रयत्न केला तो ललित अंगाकडं लक्ष ठेवून गेला.

त्यावरून कळेल की श्रोत्यांवर पहिल्याच वाक्यात टाकलेली झाक, कल्पककोट्या, उत्स्फुर्त विनोद, मार्मिक उद्‌गार, समर्पक शब्द योजना, भाषेचा विलास ही पुलंची 'सुकुमार प्रहरणं' आहेत. त्यांचा उद्देश श्रोत्यांना प्रसन्न ठेवणं, उत्साहीत करणं, आनंदित करणं, हसवणं असा होतो. काही भाषणात हास्य आणि करूण या दोन्ही रसांना उत्तेजित करणारे विभाव-अनुभाव येतात. राजकीय भाषणात श्रोत्यांची अन्यायाविरूद्धची चिड जागी केली जाते. श्रोत्यांना क्रिया प्रवण करताना आवाहक सूर लागतो.

पण केवळ रंजनाची पातळी ओलांडून जिथं भावकाव्य सदृश लहरींची प्रचिती येते तिथं पुलंच्या वक्तृत्वाला 'कले'चं रूप येतं.

मूळ प्रकाशन : स. ह. देशपांडे, मंगला गोडबोले, पुलंचं वक्तृत्व, मौज दिवाळी १९९४ पृ. ३८-५३ मधून पृ. ५१ वर.

○○○

# 'मिस्टर'

विमल रथ

नुकतीच ग्रामीण भागातली एक अडाणी पण सधन घरातली बाई माझ्याकडे काही कौटुंबिक अडचणी घेऊन आली होती. मी तिच्या नवऱ्याचा उल्लेख पती असा केलेला तिला नीटसा उमगत नव्हता, हे जेव्हा माझ्या लक्षात आलं, तेव्हा मी त्याला नवरा असं संबोधलं. बाई थोडी उसळून पण खिन्नपणे म्हणाली,

''बाई, माझ्या मालकांशी माझं कितीही भांडण असलं, तरी त्यांना नवरा नवरा असं म्हणू नका, बगा. लई वंगाळ लागतंया. त्यापरास मिश्टर की काय, ते तुमचं, म्हना. चालंल.''

मी चमकले.

अडाणी, मोलमजुरी करणाऱ्या बायांना नवऱ्याला सरसकट नवरा म्हणायला भीड वाटत नाही. क्वचित काही पुरोगामी विचाराच्या बायाही नवरा हा एकवचनी शब्द वापरायला लागल्या आहेत. शहरात वापरात असलेला 'इकडून', त्यानंतरचा 'आमचे हे' हे शब्द मागे पडत असलेले दिसतात. त्याऐवजी आता सर्रास 'मिस्टर' हा शब्द रूढ होत चाललेला आहे. (या संदर्भात महाराष्ट्रात पूर्वी काही बाया 'नवरा घरी नाहीये' हे सांगण्यासाठी 'खुंटीवर पागोटे किंवा पगडी नाहीये' असं म्हणत असत. या गोष्टीवर आता कुणाचा विश्वासही बसणार नाही.)

गेल्याच आठवड्यातली गोष्ट. मी आमच्या शेजाऱ्यांना म्हटलं,

''कमलाबाईंचे पती तुमची चौकशी करत होते.''

शेजारी क्षणभर गप्प. मग एकदम डोक्यात प्रकाश पडल्यासारखं होऊन म्हणाले,

''म्हणजे आमच्या कमलचे मिस्टर म्हणा की.''

शहरात काही प्रमाणात आणि खेड्यापाड्यांत मोठ्या प्रमाणात प्रचलित असलेले 'यजमान', 'मालक', 'धनी', हे शब्द अजून उपयोगात आहेत. पण बायांची एकंदर सामाजिक समतेची जाणीव वाढत चालल्यामुळे हे शब्द त्यांना बाईवर मालकी हक्क दाखवणारे वाटतात, म्हणून असेल किंवा/आणि 'मिस्टर' या इंग्रजी शब्दाची भुरळ पडल्यामुळे म्हणा, 'मिस्टर' या शब्दाची खूप चलती आहे. त्याचा प्रसार सर्वदूर झालेला

आढळतो.

मूलतः बाईनं नवऱ्याला नावानं तर संबोधायचं नाही आणि नवरा हा नातेसंबंध दर्शविण्यासाठी एकवचनी शब्द न वापरता आदरार्थी बहुवचनी शब्द तिनं वापरला पाहिजे, ही परंपरागत रूढी आहे. शिवाय मराठी भाषेत नवरा हा शब्द आदरार्थी बहुवचनी वापरताच येत नसल्याने अडचण निर्माण झाली आहे. म्हणजे व्याकरणाच्या दृष्टीने नवरा या शब्दाचे आदरार्थी बहुवचन होऊ शकत नाही, म्हणा किंवा तसे करण्याची पद्धत नाही, म्हणा.

कुणा तिऱ्हाईत बाईंच्या नवऱ्याविषयी जर काही कुशल विचारायचे असेल, तर बाईंना त्यांचा नवरा बरा आहे ना, असे नवऱ्याला एकवचनी संबोधून म्हटलेले योग्य समजले जाणार नाही. मग काका, मामा, दादा, वगैरे कुठल्याही परिस्थितीत तारून नेणाऱ्या व कोणत्याही नातेसंबंधाला वेळप्रसंगी लागू होणाऱ्या आणि आदरार्थी बहुवचनी वापरता येणाऱ्या शब्दांची मदत घेऊन कसेबसे मारून न्यायचे किंवा शेवटी अमुकराव, तमुकराव, म्हणजे राव या शब्दाचा आसरा घ्यायचा.

काही पुरुषांना आपल्या बायकोला बायको असे संबोधण्याचा संकोच वाटतो. तेव्हा ते मिसेस् अगर अगदी थोडे वाइफ हा शब्दही वापरतात. पण सर्वसाधारणपणे, बायकोचा उल्लेख सरसकट एकवचनी करायला सामाजिक मान्यता असल्याने अडचण येत नाही. (इथे आईचा एकवचनी आणि वडिलांचा बहुवचनी उल्लेख रूढ आहे, याची नोंद केली पाहिजे. ही गोष्ट बाईच्या सामाजिक दर्जाकडे बोट दाखवते का?) मात्र बायको हा शब्दही आदरार्थी बहुवचनी वापरता येत नाही, हे लक्षात घेतले पाहिजे.

पण एकंदरीत मिसेस् या शब्दाच्या तुलनेत मिस्टर या शब्दाने खूपच गोंधळ घातलेला दिसतो. इंग्रजीतला 'मिस्टर' हा वेगळयाच अर्थाचा शब्द नवरा या शब्दाला समानार्थी व आदरार्थी बहुवचनासाठी वापरायचा, ही गोष्ट फार विचित्र वाटते. 'मिस्टर' हा चूक शब्दप्रयोग मराठी भाषेत पुरता रुळून जायच्या आधी पती हा एकवचनी आणि आदरार्थी बहुवचनीही वापरता येणारा सोपा अर्थवाही शब्द सहज उपलब्ध असताना तो आजमितीस का बरं रूढ झाला नाही?

**१६-१९/५, पटवर्धन बाग, एरंडवणे, पुणे ४११ ००५.**

○○○





अनुक्रमणिका

## — १ —

### नाही, हो. माय मराठीचा अडसर नाही.

— श्रीनिवास दीक्षित

पत्रिकेच्या वर्ष १२, अंक १मधील संपादकीयात असा विचार मांडला आहे, की 'पुरुषवर्चस्व झुगारण्याच्या स्त्रीवादी चळवळीच्या मार्गात अडथळे निर्माण करण्यात (मराठी) भाषेनेही मोठ्या प्रमाणावर हातभार लावलेला आहे.' मराठी भाषेची रचना पुरुषप्रधान आहे. त्यामुळे स्त्रीच्या बदललेल्या स्थानाची दखल घेण्याच्या मार्गात ती भाषा अडसर ठरत आहे. एखादी स्त्री कलेक्टर असेल, तर 'कलेक्टर गाडीतून उतरले' म्हणणे चूक ठरेल आणि 'कलेक्टर गाडीतून उतरल्या' असे म्हणण्याने बुजल्यासारखे होईल. बरे, 'कलेक्टरीण' हा कर्ता करून वाक्य बनवले, तर त्याचा अर्थ कलेक्टरची पत्नी गाडीतून उतरली, असा होईल. म्हणून संपादक सुचवितात, की नवीन प्रयोग रूढ करून भाषेच्या तटबंदीला खिंडार पाडले पाहिजे.

असे काही करण्याचे श्रम फुकट होतील, असे मला वाटते. परिस्थिती बदलते, तसे शब्दांचे आणि शब्दांच्या व्याकरणिक रूपांचे अर्थही बदलतात. आपण त्यासाठी काही करावे लागत नाही.

विवाह या शब्दाचा मूळ अर्थ मुलीला पळवून आणून तिच्याशी लग्न लावणे असा आहे. ही रीत क्षत्रियास उचित अशी होती. मुलीच्या नातलगांनी तिला मंडपातून परत हिसकून नेऊ नये, म्हणून मराठ्यांच्या लग्नात नवरदेवाचा भाऊ बोहल्याशेजारी समशेर घेऊन आजही उभा असतो. पण विवाह या शब्दाचा हा सगळा अर्थ (वाह्यते इति) आज कोणाच्याही मनात येत नाही. मृत माणसाचा उल्लेख करताना त्याच्या नावापाठीमागे आपण 'कै.' असे लिहितो. त्या वेळी आपली अशी समजूत असत नाही, की या क्षणी ती व्यक्ती कैलास पर्वतावर शिवपार्वतींच्या सान्निध्यात आहे. म्हणून 'कै.' च्या ऐवजी 'चिरस्मृत' वगैरे सारखे शब्द शोधणे वृथा आहे. आमच्या कोल्हापुरात काही मुसलमान मंडळी आपल्या मृत नातलगांच्या नावांमागे 'कै.' असे लिहितात. अधिक जाणते लोक 'पै.' असे लिहितात. ही दोन्हीही उपपदे इस्लामी श्रद्धांशी विसंगत आहेत. पण त्यांमूधन 'Late' हा अर्थ व्यक्त होतो. त्यामुळे काही बिघडत नाही. नवीन शब्दाची शोधाशोध न करताही भाषिक व्यवहार शक्यच नव्हे, तर सुगम होतो. इंग्रजीत

लिहिताना सन लिहिल्यावर पुढे आपण A.D. असे लिहितो. त्याचा अर्थ 'ख्रिस्तोत्तर' असा आपण घेतो. त्याचा वाच्यार्थ स्वीकारण्याची आपली तयारी नसते. मुंबईस म्यूझिअमच्या जवळ बादशाह सातवे एडवर्ड यांचा अश्वारूढ पुतळा होता. ब्रिटिश काळात त्याला मानहानिकारक अर्थ असेल. स्वातंत्र्यानंतर तो अर्थ बदलला. 'वर माणूस बसलेल्या काळया घोड्याचे शिल्प' एवढाच अर्थ जनमानसात उरला होता. तो घोडा तेथून उचलण्यात पुरुषार्थ नव्हता.

हां. पुरुषार्थ या शब्दाचे काय करावयाचे? 'झाशीच्या राणीने रणांगणावर पुरुषार्थ गाजविला' असे म्हणावयाचे, की नाही? स्त्रीने चतुर्विध पुरुषार्थांपासून वंचित राहावयाचे काय? तिने बोलताना क्रियापदांचे 'प्रथम पुरुषी' प्रयोग करावयाचे, की नाही? (व्याकरणाच्या आडरानात शिरले, तरी धटिंगण पुरुष पुढे उभाच. म्हणे, 'प्रथम पुरुष'! निर्लज्ज.)

स्त्री ही सेनाप्रमुख किंवा राष्ट्रप्रमुख झाली, तर सेनापती किंवा राष्ट्रपती हे शब्द कसे वापरता येतील, असा प्रश्न संपादकांना पडला आहे. मला या ठिकाणी अडचण वाटत नाही. पती याचा अर्थ पालन करणारा, रक्षण करणारा असा आहे. (पाति इति।) स्वातंत्र्यवादी स्त्रीने नवरा या अर्थी पती हा शब्द वापरण्यास नकार द्यावयास हवा. "ही मेली पुरुषं आमचं रक्षण करणारी कोण आली आहेत?" असे तिने म्हटल्यास ते युगानुरूप होईल. पण तिने स्वतःला राष्ट्रपती अथवा सेनापती म्हणवून घेण्यात काही अडचण नाही. पती हा शब्द पुंलिंगी असल्याने स्त्रीलिंगी उद्देश्यासाठी विधेय म्हणून तो कसा वापरता येईल, अशी शंका घेऊ नये. 'मारुती बलवान व्यक्ती होती, (होता?) असे म्हणता येते. 'व्यक्ती' स्त्रीलिंगी. 'मारुती' पुंलिंगी. चालते. ('भीमसेठ बडी आसामी होती' असे म्हणावयाचे, की 'होता' असे म्हणावयाचे? माहीत नाही. अशोको जानाति।) 'विजयाराजे शिंदे राष्ट्रपती झाल्या' हे वाक्य चूक ठरू नये. तसे म्हटले, तर 'मंत्री' हा शब्द पुंलिंगी आहे. म्हटले, तर पुरुषत्ववाचकही आहे. पण 'इंदिरा गांधी या देशाच्या महामंत्री होत्या' या वाक्यात कोणास काही तिरपागडे दिसत नाही.

समाजातील महत्त्वाची पदे स्त्रिया काबीज करत चालल्या आहेत. या वास्तवाच्या अभिव्यक्तीत भाषेकडून अडसर येतो, असा संपादकांचा दावा आहे. तो मला अमान्य आहे. व्यावसायिक पदांचा अर्थ विशेषणात्मक असतो आणि बहुतेक पदनामे अकारान्त असतात. (अध्यक्ष, सचिव, इत्यादी) अकारान्त विशेषणे मराठीत उभयलिंगी (खरे म्हणजे स्त्रीलिंगी) वापरता येतात. आंबा गोड असतो आणि खीर गोड असते. गोल चेंडू आणि गोल साडी, चेंडू पुंलिंगी; साडी स्त्रीलिंगी, मग प्राध्यापिका, प्राचार्या, शिक्षिका, कुलसचिवा, अध्यक्षा असे शब्द कशासाठी बनवायचे? स्त्रियांच्या संदर्भातही प्राचार्य, अध्यक्ष अशी पदनामे वापरण्यास काय हरकत आहे? 'विजया राजाध्यक्ष' समारंभाच्या अध्यक्ष होत्या' असे म्हणण्यात काय वावगे आहे? डॉक्टर, कलेक्टर वगैरे शब्द उभयलिंगी चालू शकतील, अशी मान्यता संपादकांनी दिली आहे.

या शब्दांचे सामान्यरूप होत नाही, हे त्याचे कारण म्हणून ते सांगतात. ते खरे नाही. त्यांची सामान्यरूपे होतात. 'आणि अश्रू पुशियले डॉक्टरांनी'- अशी ओळ गिरीश कवींनी लिहिलेली आहे. ''शेषन यांनी दहा कलेक्टरांच्या बदल्या थोपविल्या'' अशी बातमी उद्याच्या वृत्तपत्रात येऊ शकेल. या दोन्ही वाक्यांतून डॉक्टर, कलेक्टर यांची सामान्यरूपे झालेली आहेत. परभाषेतील शब्दांचे मराठीशी पूर्ण सात्मीकरण होईपर्यंत त्याचे सामान्य रूप-बनविण्यास आपण कचरतो. 'कोटाचा खिसा' असे म्हणतो. पण 'शर्टाचा खिसा' असे म्हणण्याऐवजी 'शर्टचा खिसा' असे म्हणणे पसंत करतो. कोट मराठला. पण सदरा असा प्रतिशब्द उपलब्ध असल्याने शर्टच्या शुद्धीकरणास विलंब लागतो. म्हणून अकारान्त पदवाचक शब्द उभयलिंगी वापरण्यासाठी त्या शब्दाचे सामान्यरूप होणे, न होणे ही बाब अप्रस्तुत आहे.

(येथे एक अप्रस्तुत शंका विचारतो. 'गेल्या मार्चात पुण्यात होतो' असे म्हणणे गावंढळ वाटते. 'मार्चमध्ये' असा सामान्यरूपविरहित शब्दयोग साधणे नागर दिसते. पण 'डिसेंबरात मुंबईस असेन' हे म्हणणे ठीक दिसते. मार्च आणि डिसेंबर यांच्या भाषिक तापमानात एवढा फरक का? एप्रिल, मे, जून आणि ऑगस्ट हे महिनेही सामान्यरूप स्वीकारावयास खळखळ करतात.)

'ईण' प्रत्यय लावून पदवाचक शब्दांची स्त्रीलिंगी रूपे स्वीकारण्यास संपादक राजी नाहीत. त्यांचे म्हणणे आहे, की असे शब्द पत्नीत्व-बोधक असतात-जसे, फौजदार; फौजदारीण. मला वाटते, की 'ईण' प्रत्ययाचा प्राथमिक अर्थ स्त्रीत्व-बोधकच आहे. पत्नीत्व-बोधक अर्थ अनुषंगाने आला आहे. पहिलटकरीण म्हणजे पहिलटकराची पत्नी नव्हे. कळवंतीण ही कलावंताची (अथवा, आणखी कोणाची) पत्नी नसते. हीच तऱ्हा स्वयंपाकीण, मोलकरीण, इत्यादी शब्दांची आहे. हे शब्द कृतिदर्शक अथवा व्यवसायदर्शक असून, व्यवसाय करणारी व्यक्ती स्त्री आहे, असे दाखवितात. पुढे गरज पडली, तर पैलवानीण असा शब्द बनवावा लागेल. तो व्यवसाय करणारी स्त्री आज नाही, म्हणून तो शब्द वापरात नाही, एवढेच. पण जेव्हा तो वापरला जाईल, तेव्हा त्याचा अर्थ पैलवानाची पत्नी असा होणार नाही. मालकीण याचा अर्थ मालकाची बायको असा होईलही. पण तो मुख्य अर्थ नव्हे. अविवाहित स्त्रीही एखाद्या इमारतीची मालकीण असू शकते. (मालक हा शब्द तत्सम नसल्याने त्यास 'इका' प्रत्यय लावता येणार नाही. त्या यावनी शब्दाशी जबरीने 'इका' प्रत्ययाचा निका लावल्यास मालकिका असे रूप मिळेल; मालिका असे नाही.) डॉक्टरीण, इंजिनीअरीण, फौजदारीण या पदांची शक्ती थोडी पत्नीत्वाकडे धावते. कारण त्या त्या व्यवसायात प्रत्यक्षतः स्त्रियांची संख्या कमी आहे. वरील तिन्ही शब्दांत व्यवसायबोधकत्व उत्तरोत्तर कमी होत आहे, असे दिसेल. कारण त्या तीन व्यवसायातील स्त्रियांची संख्याही त्याच क्रमात कमी कमी आहे. संख्या वाढवा. शब्दांचे अर्थ विस्तारतील.

ह. ना. आपटे यांच्या काळात मास्तरीण याचा अर्थ मास्तरांची पत्नी असा होता. कारण त्या शब्दाच्या वाच्यार्थाचा प्रत्यक्षात बाध होत होता. पुढे परिस्थिती बदलली आणि आज शहरी मराठीत त्या शब्दाचा पूर्वीचा अर्थ लुप्त झाला.

वैचारिक पर्यावरण बदलेल, तसे स्वतः होऊनच शब्द नवे नवे अर्थ पांघरतात. जुने अर्थ आत लपलेले राहतात. स्त्रियांनी कितीही बाजी मारली, तरी माय मराठी तिला अडसर करणार नाही. तीही बिचारी स्त्रीलिंगीच आहे.

**२१ आयडियल सोसायटी, सागर माळ, कोल्हापूर, ४१६००८.**

○○○

## — २ —

### गौरी देशपांडे यांच्या प्रतिसादावर खुलासा

**विजया देव**

संदर्भ : १२ : २/उन्हाळा, १९९४

प्रसंगोत्पन्न विनोद आणि सर्वसाधारण भाषिक नवप्रयोग यांच्यांत, गौरी देशपांडे समजतात, तशी पक्की सीमारेषा नसते. भाषेमध्ये उच्चार, शब्दरूप, अर्थ अशा सर्वच पातळ्यांवर होणारे बदल एका मोठ्या भाषिक परिवर्तनाचा भाग असतात. त्याचे एक कारण, म्हणजे बोलणारा भाषेचा सर्जक वापर करतो, भाषेची अभिव्यक्तिक्षमता ताणतो, दैनंदिन जीवनातील विविध प्रसंगांना, अनुभवांना शब्दरूप देण्यासाठी उत्स्फूर्तपणे भाषा वाकवतो. ही घडामोड आपल्या सामाजिक जीवनात सतत, कळत-नकळत चाललेली असते. 'उत्पद्यन्ते विलीयन्ते' अशीच अवस्था बहुतेक भाषाप्रयोगांची होते. त्यांपैकी काही मोजके प्रयोग भाषेत रुजतात, स्थिरावतात, सरसकट वापरात यायला लागतात. या निर्मितिप्रक्रियेत साहित्याचाही वाटा असतो. एकदा हे भाषिक प्रयोग रूढ झाले, की त्याचे मूळ आपल्या हातून निसटून जाऊ शकते; आणि हे प्रयोग निर्माण कसे झाले, याचे कुतूहल शिल्लक राहते. शिवाय कोणते भाषाप्रयोग लोकांच्या तोंडी रुळतील आणि कोणते गळून पडतील – मग ते साहित्यातून येवोत, की लोकजीवनातून– याचे भाकीत कोणालाही करता येत नाही.

तेव्हा आपल्या डोळयांसमोर जे घडतं, त्यावरूनच आपल्याला वाक्प्रयोगांच्या निर्मितीची, प्रवासाची झलक पाहायला मिळू शकते. भाषेची आणि दैनंदिन व्यवहाराची सांगड महत्त्वाची. त्यातून जे निर्माण होतं, ते व्यापक भाषाव्यवहाराचा भाग बनतं, की नाही, हे गौण. कारण ज्याला 'सातत्य', 'सरसकट वापरात येऊन भाषिक व्यवहाराचा एक भाग बनणं' असं गौरी देशपांडे म्हणतात, त्या व्याप्तीलाही मर्यादा असतात. त्यांनी उद्‌धृत केलेल्या साहित्यिक शब्दप्रयोगांबद्दल पूर्णपणे अनभिज्ञ





अनुक्रमणिका

असलेली पण आपापल्या जागी रसरशीत भाषा वापरणारी माणसंही त्याच समाजाचा अविभाज्य भाग असतात.

**सुप्रिया, ६१/१६ एरंडवणे, आयकर भवनासमोरची गल्ली, पुणे ४११ ००४.**

○○○

## — ३ —

## वस्तुस्थितीचा स्वीकार

**श्री. पु. भागवत**

सप्रेम नमस्कार वि.

'भाषा आणि जीवन' (दिवाळी, १९९३) मधील तुमचे संपादकीय वाचले. तो विषय माझ्याही जिव्हाळयाचा झाला आहे. तुम्हांला कदाचित माहीत असेल, माझी सून अमेरिकन आहे. तिची आई जर्मन. माझी नातवंडे अर्थात अमेरिकन. आम्ही तिथे गेलो, तर त्यांच्या कानांवर मराठी पडणार; किंवा ती इकडे आली, तर क्वचित अशोककडे कुणी कुटुंबीय आले किंवा तो तिथल्या मराठी परिचिता-स्नेह्यांशी भेटला–बोलला, तर. एरवी त्यांच्या शेजारी वा कामाच्या ठिकाणी मराठी बोलणारे कुणी नाही. कामाच्या स्वरूपामुळे प्रसंगही येत नाही. त्याने, मला वाटते, या वस्तुस्थितीचा स्वीकार केला आहे; आणि त्याला तुम्ही उल्लेख केलेल्या बाईंसारखा प्रश्न पडत नाही. आम्हीही नातवंडांकडे महाराष्ट्रीय बापाची अमेरिकन मुले म्हणूनच पाहतो आणि त्यांच्याकडून मराठी भाषेच्या ज्ञानाची अपेक्षा ठेवीत नाही. पुढे कधी त्यांना आपल्या कुळा-मुळांबद्दल कुतूहल वाटले आणि ते खूप जोराचे असले, तर ती जरूर तर मराठी भाषा, समाज, संस्कृती जाणून घेतील. (त्या दोघांचेही एक नाव मराठी आहे. मोहन व लक्ष्मी. आडनाव भागवत. त्यांच्या आईने आपले माहेरचे नावच कायम ठेवले आहे. हेलन गे.) मला एक उदाहरण असे माहीत आहे, की मुलांना मराठी भाषा, संस्कृती, रीतिरिवाज माहीत व्हावेत, म्हणून माझ्या एका स्नेह्यांनी मुलांना व त्यांच्या आईला पुण्यात दोन किंवा तीन वर्षे ठेवले. शाळेत घातले. ते कुटुंब ८५ साली आम्हांला भेटले, तेव्हा त्या मुलांत इथे काही मराठी संस्कार झालेच असतील, तर त्यांतले फारसे शिल्लक उरले असावेत, असे वाटले नाही. तेव्हा तुम्ही संपादकीयात त्याबद्दल व्यक्त केलेली शंका मला रास्त वाटते. किंबहुना, अशा प्रयत्नांबद्दलच शंका वाटते. असो. त्या बाईंचा प्रयोग अभ्यास करण्यासारखा मात्र आहे.

लोभ ठेवावा, ही विनंती.

**मातृस्मृती, प्लॉट क्र.७४, स्कीम क्र.६, रोड क्र.४, सायन (पूर्व), मुंबई ४०० ०२२. फोन : ४०७३३९१.**

○○○





अनुक्रमणिका

— ४ —

## भारताबद्दल दुरभिमान नको

**सुहास निमकर**

संदर्भ : भाषा आणि जीवन, दिवाळी १९९३मधील संपादकीय

कॅनडामध्ये भारताबद्दल गैरसमज आहेत, हे खरं, पण भारतातही पाश्चात्त्यांविषयी खूप गैरसमज आहेत. स्त्रियांनी केवळ तोकडे पोशाख घातले, म्हणजे त्यांचं चारित्र्य खराब आणि शरीरं साड्यांमध्ये गुंडाळून ठेवली, तर ते शुद्ध अशी समजूत असेल, तर ती चुकीचीच म्हणायला हवी. स्त्री-पुरुष संबंधाविषयीचा इथला approach वेगळा आहे, आपल्यापेक्षा कमी किंवा अधिक चांगला आहे, असं नाही. पण तो कसा वेगळा आहे, हे डोळसपणे इथल्या भारतीयांनी पाहायचा प्रयत्न केला, तर गैरसमज कमी होतील. सासऱ्या-सुनेमधील मोकळे आणि बरोबरीचे संबंध तुमच्या 'संपादकीया'तील बाईंना पसंत नसतील, तर त्याला सुनेचे तोकडे पोशाख जबाबदार, की बाईंचं तोकडं मन, याची मला खात्री नाही.

तरुण पिढीने वडीलधाऱ्यांना मान द्यावा, ही आपल्याकडची प्रथा मला आवडते. पण तरुण पिढीकडून आज्ञाधारकपणा किंवा (docile) वागणुकीची बाईंची अपेक्षा आहे, तिचा परिणाम आपल्याकडच्या अनेक तरुणांच्या विचार-स्वातंत्र्यावर बंधन पडण्यात होतो, असं वाटतं. दोन पिढ्यांमधील मोकळ्या वागणुकीने आपल्या संस्कृतीचा ऱ्हास होत असेल, तर त्या संस्कृतीने आपल्या मूल्यांचं परीक्षण करायला हवं...

ऋता सुरुवातीपासून इथल्या एका Private शाळेमध्ये जाते. त्यामुळे Public Schoolच्या वातावरणाविषयी मला तितकीशी माहिती नाही. ऋताला तिच्या राष्ट्रीयत्वाबद्दल विचारलं गेलं, तर 'I am Canadian' असं तिचं उत्तर असतं आणि त्यात मला काही वावगं वाटत नाही. आईवडिलांविषयी विचारलं गेलं, तर आई मुळातली आफ्रिकेतली आणि वडील भारतातले, हे सांगण्यात ऋताला कधी न्यूनगंड वाटलेला नाही.

मला मराठी भाषेविषयी शाळकरी वयापासून प्रेम आहे. (भाषाप्रभुत्व टिकवून ठेवणं मात्र आता थोडं कठीण होत चाललं आहे.) माझ्या वडीलधाऱ्यांनी मला इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घातलं नाही, याबद्दल मला कृतज्ञताच वाटते. पण ऋताचं विश्व वेगळं आहे. मराठी भाषा शिकण्यापेक्षा आईवडिलांची जीवनमूल्यं तिनं शिकणं हे मला अधिक महत्त्वाचं वाटतं. त्या मूल्यांचं महत्त्व जाणणारे आईवडील इथल्या समाजातही खूप आहेत. त्यांच्याशी जमेल तितके संबंध जोडले, म्हणजे दोन भिन्न संस्कृतींतलं समत्व नजरेला येतं, भिन्नपणा तितकासा जाचत नाही.



अनुक्रमणिका

कॅनडातली 'जीवनपद्धती आपल्याला पटो ना पटो, तिच्याशी जुळतं घेतलंच पाहिजे' हे बाईंचं म्हणणं अर्धसत्य आहे. स्वतःची जीवनपद्धती स्वतः ठरवण्याचं स्वातंत्र्य या समाजात आहे. पण इथल्या समाजातल्या सुविधांचा उपभोग घ्यायचा असेल, तर इथले नियम आणि सामाजिक संकेतही पाळायला हवेत. ते न पाळले, तर इथले लोक नाक मुरडतील, इतकंच. इथे कित्येक शीख आणि इतर भारतीय आपले पोशाख, आपल्या भाषा, आपले जातिधर्मभेद या सर्वांचं जतन करून दशकानुदशक राहिले आहेत. बाईंनी तोकडे पोशाख घालावेत, अशी सक्ती इथे नाही किंवा त्यांच्या मुलाने अमेरिकन मुलीशी लग्न करायला पाहिजे, असाही कायदा नाही.

बाईंच्या मुलाची मराठीतली प्रगती स्पृहणीय खरी, पण तिचा आणि त्याच्या न्यूनगंडाचा काही संबंध नाही. भारतीयपणाचा न्यूनगंड मुलाच्या वडिलांकडून उतरला असावासं वाटतं. पुण्यात एका वर्षात झालेले संस्कार वडिलांच्या विचारसरणीचा प्रभाव धुऊन टाकणार असतील, तरच बाईंनी केलेलं धाडस सार्थ ठरेल.

या माझ्या पत्रावरून मलाही आपल्या संस्कृतीचा अभिमान नाही, अशी तुमची समजूत झाली, तर ती चुकीची आहे. जेव्हा जेव्हा संधी मिळते, तेव्हा तेव्हा इथल्या लोकांना भारताच्या भाषासमृद्धीविषयी आणि इतिहासाविषयी सांगण्याचा प्रयत्न मी करतो. पण आपली संस्कृती तेवढी चांगली आणि पाश्चात्त्य संस्कृती आणि माणसं कनिष्ठ असा दुरभिमान मला नाही. आणि केवळ 'पूर्व दिव्य ज्यांचे, त्यांना रम्य भाविकाल' असा कविमनाचा भरवसा धरून चालणं हे धोक्याचं आहे, असं मला वाटतं. असो.

**३१०१, टूर्स रोड, मिसीसागा, ओन्टॅरिओ, एल्५एन्३एच्९.,**

**टेलिफोन : (९०५) ८२४-१९६४**

○○○





अनुक्रमणिका

# निवेदन

# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ

## नवलेखक अनुदान योजना

नवलेखकांना उत्तेजन मिळावे, म्हणून त्यांच्या प्रथम व द्वितीय पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्याची 'नवलेखक अनुदान योजना' महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने कार्यान्वित करण्यात येत असून, या योजनेखाली सन १९९४-९५ चालू आर्थिक वर्षासाठी नवलेखक/कवींकडून साहित्य मागविण्यात येत आहे. नवलेखक/कवी या संज्ञेत ज्याचे एकही पुस्तक प्रकाशित झालेले नाही किंवा ज्याचे पहिले मंडळाच्या या योजनेतील अनुदानाने प्रकाशित झाले आहे. अशाच नवलेखक/कवींचा समावेश करण्यात येतो. या योजनेत नवलेखक/कवींनी त्यांची पुस्तके स्वतः पाठविताना किंवा नवलेखक/कवींची पुस्तके प्रकाशकांनी पाठविताना पुढील गोष्टी कृपया लक्षात घ्याव्यात :

१) या योजनेखाली वर उल्लेखिलेल्या नवलेखक/कवींच्या प्रथम व या योजनेतील अनुदानाचे ज्याचे पहिले पुस्तक प्रकाशित झाले आहे, त्याच लेखकाच्या द्वितीय पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुदान देण्यात येते.

२) या नवलेखक अनुदान योजनेत अनुदानासाठी सादर करावयाच्या अर्जासोबत संबंधित नवलेखकाने/कवीने त्याच्या छायाचित्रासह राजपत्रित अधिकारी, महाविद्यालयाचे प्राचार्य व प्राथमिक/माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक यांपैकी एकाचे ओळख दर्शविणारे प्रमाणपत्र संस्थेच्या शिक्क्यासह सादर करणे आवश्यक आहे. लेखक/कवीने हे ओळख प्रमाणपत्र आपल्या अर्जासोबत न पाठविल्यास त्याचा अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

३) काव्य, नाटक/एकांकिका संग्रह, कादंबरी, लघुकथा, ललितगद्य, बालकुमार साहित्य या कोणत्याही प्रकारातील वाङ्मय असावे आणि ते १ ऑक्टोबर, १९९५ पर्यंत मंडळाकडे पाठवावे. त्यानंतर पाठविलेले हस्तलिखित पुढील वर्षात विचारात घेतले जाईल. वैचारिक स्वरूपाचे हस्तलिखित विचारात घेतले जाणार नाही.

४) लेखक/कवीने मंडळाकडे हस्तलिखित पाठवंताना त्यात आपले नाव, पत्ता किंवा अन्य तऱ्हेने त्यांची ओळख पटेल, असा मजकूर लिहू नये. तज्ज्ञ-परीक्षकांकडे हस्तलिखित अभिप्रायासाठी पाठवताना लेखकाचे नाव, पत्ता वगैरेंबद्दल मंडळ गोपनीयता राखते. मात्र मंडळास हस्तलिखित सादर करताना लेखक/कवीने आपले

नाव, पत्ता, हस्तलिखिताचे शीर्षक, वाङ्मयप्रकार यांबद्दलचा तपशील एका वेगळया कागदावर लिहून तो हस्तलिखितासोबत पाठवावा. लेखक/कवीचे एक पुस्तक मंडळाच्या अनुदानातून आधी प्रकाशित झाले असल्यास त्याचा तपशील कळवावा.

५) पुस्तकाची मुद्रणप्रत हस्तलिखित स्वरूपात असल्यास ती पानाच्या एकाच बाजूस व सुवाच्य अक्षरात लिहिलेली असावी. मुद्रणप्रत/टंकलिखित, चक्रमुद्रित किंवा झेरॉक्स केलेली असल्यास, पानाच्या एकाच बाजूस व स्पष्ट असावी. तसेच कात्रणे असल्यास, ती कागदावर एकाच बाजूस क्रमाने व्यवस्थित चिकटविलेली असावीत. हस्तलिखित अशुद्ध असल्यास व त्यातील मजकूर वाचता येण्याजोगा नसल्यास हस्तलिखिताचा विचार केला जाणार नाही.

६) मुद्रणप्रत मंडळास मिळाल्यानंतर त्याची पोच दिली जाईल व त्यानंतर योग्य वेळी अनुदानाबद्दल निर्णय कळविला जाईल. मंडळाकडे आलेली हस्तलिखिते तज्ज्ञ-परीक्षकांकडे पाठवली जातात. त्यांचा अभिप्राय अनुकूल असला, तरच हस्तलिखितास अनुदान देण्याबाबत मंडळ निर्णय घेते. त्याबाबतचा निर्णय कळविला जाईपर्यंत निष्कारण पत्रव्यवहार करू नये. हस्तलिखिताबद्दलचा निर्णय एप्रिल अखेरपर्यंत कळवला जाईल.

७) अनुदानास पात्र ठरलेल्या साहित्यात तज्ज्ञांच्या अभिप्रायानुसार काही फेरफार आवश्यक वाटल्यास ते करून, स्वच्छ मुद्रणप्रत तयार करून देण्याची जबाबदारी लेखकाची राहील. ही सुधारित प्रत मंडळाच्या हाती आल्यानंतरच अनुदानासंबंधीचा अंतिम निर्णय घेण्यात येईल.

८) अनुदानास पात्र न ठरलेली मुद्रणप्रत किंवा या योजनेच्या नियमांत न बसणाऱ्या पुस्तकाची मुद्रणप्रत लेखक/कवीस परत हवी असल्यास तीन महिन्यांच्या मुदतीत मंडळाच्या कार्यालयातून न्यावी लागेल. लेखक/कवींना मुद्रणप्रत रजिस्टर पोस्टाने हवी असल्यास आवश्यक त्या रकमेची पोस्टाची तिकिटे आधीच पाठवावी लागतील.

९) स्वीकृत साहित्याच्या संपादनाचे व पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाचे सर्व अधिकार मंडळाकडे राहतील.

१०) मुद्रणप्रत दोन प्रतींत असावी व तिची एक प्रत खालील पत्त्यावर पाठवावी व दुसरी प्रत नवलेखक/कवीने स्वतःकडे ठेवावी. मुद्रणप्रत गहाळ झाल्यास त्याची जबाबदारी मंडळावर राहणार नाही.

अनुदानासाठी नमुना-अर्ज व माहितीपत्रक मागविणे, तसेच, हस्तलिखिते पाठविण्यासाठी पत्ता खालीलप्रमाणे :-

सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ.

एल्सा हटमेंट, 'डी' ब्लॉक, आझाद मैदान, महापालिका मार्ग, मुंबई - ४०० ००१.

**परिषद - वार्ता**

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने प्रतिवर्षी मराठीतील सर्वोत्कृष्ट भाषाविषयक लेखनास बँक ऑफ महाराष्ट्र या संस्थेने पुरस्कृत केलेले **'महाबँक पारितोषिक'** दिले जाते. १९९४ सालातील पारितोषिकासाठी डॉ. द. न. गोखले यांच्या **शुद्धलेखन विवेक** या ग्रंथाची निवड करण्यात आली. हे पारितोषिक डॉ. गोखले यांना ६ डिसेंबर १९९४ रोजी पं. वामनशास्त्री भागवत यांच्या हस्ते देण्यात आले.

OOO

## असाही एक अनुवाद - लोकशिक्षणार्थ

'सिकल सेल' ॲनिमिया त्यांना या भागात सापडला... व्यापक पाहणीत 'सिकल सेल' चे वाहक खूप सापडले. या वाहकांनी आपसांत लग्न करायचं टाळलं, तर काही वर्षांनी नॉर्मल माणसांचं प्रमाण वाढत जाईल आणि सिकल सेल वाहकांचं प्रमाण कमी होत कदाचित पूर्णपणे नाहीसंही होईल. उलट, वाहकांनी आपापसांत लग्नं केली, तर प्रत्यक्ष सिकल सेल रोग झालेल मूल जन्मू शकेल.

अभयचं मी एक भाषण ऐकलं. (पदक्रम यथामूल) तो म्हणाला,

''आपल्या गोंड लोकांत काही देव असतात. एक देव, दोन देव, तीन देव, चार देव. एक देवाचं लग्न दोन देवांशी होतं, तीन देवांशी , चार देवांशी होतं, पण एक देववाल्याचं लग्न एक देववाल्याशी लागतं का? ('नाही') लावलं, तर काय होतं? ('देवाचा कोप होतो.') मग आता एक नवीन देव आलाय्. त्याचं नाव 'सिकल देव'. आता सिकल देववाल्याचं सिकल देववाल्याशीच लग्न लावलं, तर सिकल देव कोपतो. कोपला, की काय करतो, तर त्याच्या मुलांना त्रास होतो,'' असं सांगून त्यानं सिकल सेलच्या स्लाईड्स् दाखविल्या.

*अनिल अवचट, 'शोध' आरोग्याचा (अभय व राणी बंग या डॉक्टर दांपत्याच्या गडचिरोली जिल्ह्यातील कामातून), साप्ताहिक सकाळ, दिवाळी विशेषांक, १९९४:१०:२९ पृ. २१० (संदर्भ : भाषा आणि जीवन, दिवाळी १९८५ (मराठी भाषेतील पदक्रम), लोकशिक्षण विशेषांक १९९२-९३, अनुवाद विशेषांक १९९३)*





अनुक्रमणिका

सूचना फलक

## पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यांसबंधी (वृत्तपत्रे आणि पुस्तके नोंदणी अधिनियम, कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली, १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यानंतर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते ते निवेदन)

| | |
|---|---|
| १. प्रकाशन–स्थळ | पुणे, महाराष्ट्र |
| २. प्रकाशनाची कालनियतता | त्रैमासिक, जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये |
| ३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता | मृणालिनी शहा, भारतीय, १, शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४ |
| ४. मुद्रणस्थळ | संगम प्रेस, कर्वे रोड, पुणे ४११ ०२९. |
| ५. प्रकाशकाचे नाव राष्ट्रीयता, पत्ता: | मृणालिनी शहा, भारतीय, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे |
| ६. संपादकाचे नाव राष्ट्रीयता, पत्ता : | कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७. |

७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते :

मराठी अभ्यास परिषद, द्वारा. अशोक रा. केळकर, ७, धनंजय सोसायटी, ७५९/८३, शिवाजीनगर, पुणे ४११ ००४.

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते, की वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**मृणालिनी शहा**
**प्रकाशक**
**पुणे, २० मार्च, १९९५**

**पैसे भरण्याबद्दल सूचना**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता रक्कम आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी**

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकांसाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

**जाहिरातीसाठी दर**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

◆ आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?

⁂ सभासद नसाल तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

⁂ सभासद असताल तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.

⁂ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल, तर चिटणिसांशी संपर्क साधा.

⁂ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

⁂ परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.

⁂ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

◆ आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?

⁂ लेखन पाठवा.

⁂ परभाषांतून अनुवाद करा.

⁂ ग्रंथ परीक्षणे लिहा.

⁂ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराबद्दल सूचना पाठवा.

⁂ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

⁂ पत्रिकेत भाषाव्यवहाराशी संबंधीत हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

⁂ जाहिरात मिळवून द्या.

⁂ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

—संपर्क —
*मराठी अभ्यास परिषद,*
*१, शीतल अपार्टमेंट*
*४६/४ एरंडवन, पुणे ४११ ००४*
*(दूरध्वनी : ३३ ३८ ६९)*